


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २९०

जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर १९९९

■

विशेष लेख :

त्र्यं. वि. सरदेशमुख :
व्रतस्थ, व्यासंगी व स्वतंत्र दृष्टीचे समीक्षक
प्रा. रा. ग. जाधव

■

कुसुमाग्रजांच्या गावी
डॉ. मंदा खांडगे

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९०

जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९९

□



□

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड,

पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७५९६३

अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका





मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २९० - जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९९
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय

ह. ल. निपुणगे

*मे. केशव भिकाजी ढवळे ही नामवंत प्रकाशन संस्था आपले शताब्दीवर्ष साजरे करीत आहे. प्रकाशन व्यवसायात सातत्याने शंभर वर्षे टिकून राहणे ही फारच अवघड गोष्ट या संस्थेने साध्य केली आहे, त्याबद्दल खरोखरच आनंद वाटतो आणि या संस्थेचा मराठी मनाला अभिमानही वाटतो.*

*बालवाङ्मय, कुमारवाङ्मय, धार्मिक वाङ्मय इत्यादी वाङ्मयाच्या विविध दालनात देखणी पुस्तके प्रकाशित करून त्यांनी आपल्या या क्षेत्रातील कर्तृत्वाचा ठसा उमटविला आहे.*

*या निमित्ताने एकूणच प्रकाशन व्यवसायावर दृष्टिक्षेप टाकला असता अनेक गोष्टी लक्षात येतात. मौज प्रकाशन, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, मॅजेस्टिक प्रकाशन, पॉप्युलर प्रकाशन यासारख्या नामवंत प्रकाशन संस्था केवळ ललित वाङ्मय आणि त्याच्या जोडीला काही सतत लागणारी ग्राहकांच्या गरजेची पुस्तके प्रकाशित करून आपले स्थान बळकट करून टिकून आहेत. अलिकडच्या काळात राजहंस प्रकाशन, मेहता पब्लिशिंग हाऊस या प्रकाशन संस्थांनीही निवडक दर्जेदार वाङ्मय प्रकाशित करून स्वत:चे विशेष स्थान निर्माण केले आहे. प्रकाशनाची उत्तम जाण असलेल्या या प्रकाशन संस्था आहेत, असेच म्हणावयास हवे.*

*पुस्तकांच्या वाढत्या किंमती, वाढते निर्मितीमूल्य आणि घटलेला ग्राहकवर्ग हे लक्षात घेता या व्यवसायाच्या भवितव्याबद्दल नेहेमीच चिंता व्यक्त केली जाते. परंतु अशाही परिस्थितीत नित्य नवनव्या प्रकाशन संस्था उदयाला येताना दिसतात. कित्येक लेखक आपले पहिले पुस्तक आपणच प्रकाशित करून नवीन प्रकाशन संस्था सुरू करताना दिसतात. अर्थात अशा प्रकाशनांना कोणताही कस लागलेला नसतो. त्यात अनेक मुद्रणदोष असतात. मांडणी आकर्षक नसते. पुस्तकांची संख्या अशा प्रकारे सतत वाढत चालली आहे. मागणी मात्र कमी होत चालली आहे. पुस्तकांच्या वाढत्या किंमतींमुळे वाचनालय-ग्रंथालयांना मिळणाऱ्या अनुदानातून त्यांनी खरेदी करावयाच्या पुस्तकांची संख्या सतत घटत चालली आहे.*

*या सर्व प्रकारांमुळे पुस्तक विक्रीवर खूपच प्रतिकूल परिणाम होत चालला आहे. वाढत्या किंमती आणि वाढती सूट यामुळे प्रकाशन व्यवसायात उघडउघड दोन तट*

पडले आहेत. एक आहे चांगली दर्जेदार पुस्तके निर्माण करणाऱ्या पण योग्य कमिशन देणाऱ्या प्रकाशन संस्थांचा गट आणि दुसरा आहे कोणतीही पुस्तके प्रकाशित करणाऱ्यांचा आणि भरमसाठ कमिशन देऊन गावोगावी जाऊन फिरून पुस्तके विकणाऱ्यांचा गट.

प्रकाशन संस्थांच्या त्यामुळेच दोन संघटना तयार झाल्या आहेत आणि त्या आपआपल्या परीने चांगले काम करीत आहेत.

उत्तम वाङ्मयीन मूल्ये असलेली दर्जेदार पुस्तके कमी वेगाने खपत असली तरी ती निश्चितपणाने खपत असतात. कमी दर्जाची पुस्तके सुरुवातीला कमिशनमुळे अधिक वेगाने खपत असली तरी पुढे ती अजिबात खपत नाहीत आणि मग ती भरमसाठ कमिशनने काही ठराविक पुस्तक विक्रेत्यांच्या पदरात घालून मोकळे व्हावे लागते.

प्रकाशन संस्था टिकायला हव्या असतील तर, त्यांचे शतक महोत्सव साजरे व्हायला हवे असतील तर दर्जेदार साहित्याचे प्रकाशन व्हायला हवे. प्रकाशन व्यवसायात चांगले संपादन करणारे संपादकही हवेत. लेखकांनीही दर्जेदार साहित्य निर्मितीकडे कटाक्षाने लक्ष द्यायला हवे. पूर्वी असे कथालेखक होते की, त्यांच्या शंभरेक कथा मासिकातून प्रकाशित झाल्याखेरीज ते कथासंग्रह प्रकाशित करण्याचा विचार करीत नसत. कवी मंडळी चार-पाचशे कविता मासिकांतून, वृत्तपत्रांतून प्रकाशित झाल्यावरच कविता संग्रहाचा विचार करीत असत.

अलिकडे १०-१५ कथा प्रकाशित झाल्या की, लेखक स्वत:च पैसे घालून कथासंग्रह प्रकाशित करतात. अशा वेळी कथांची निवड करायला वाव असतो का? कवितासंग्रहाचीही अशीच गोष्ट आहे.

उत्तम साहित्य प्रकाशित होऊन प्रकाशन संस्थांचे शतक महोत्सव साजरे व्हावे असे वाटत असेल तर लेखकांनी आपल्या लेखनाचे आत्मपरीक्षण केले पाहिजे. प्रकाशकांनीही निवडक पुस्तके प्रकाशित करून आपल्या प्रकाशन संस्थांची विश्वासार्हता वाढविली पाहिजे. अमुक एका प्रकाशन संस्थेने प्रकाशित केलेले पुस्तक म्हणजे किमान दर्जेदार असणारच अशी वाचकांची खात्री पटली पाहिजे. लेखकांना आणि प्रकाशकांना प्रोत्साहन देणारी अनेक पारितोषिके सध्या दिली जातात. ही पारितोषिके म्हणजे दर्जेदार साहित्य निर्मितीला मोठाच आधार आहे. त्यामुळेही अनेक दर्जेदार पुस्तके निर्माण होताना दिसतात. वाचकांनाही पारितोषिक प्राप्त पुस्तक मिळवून वाचावेसे वाटते ही फारच मोठी भाग्याची गोष्ट आहे.

हे सर्व होऊन उत्तम साहित्याची निर्मिती झाली तर, अनेक प्रकाशन संस्थांचे शतक-महोत्सव साजरे होतील.

□



अनुक्रमणिका

# त्र्यं. वि. सरदेशमुख : व्रतस्थ, व्यासंगी व स्वतंत्रदृष्टीचे समीक्षक

प्रा. रा. ग. जाधव

---

### सर्जनशील आत्मनिष्ठेचा व्रतस्थ उपासक

या विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील ज्या मोजक्या मराठी साहित्यिकांनी आपली सर्जनशील आत्मनिष्ठा व्रतस्थपणे जपली व विकसित केली, त्यांत त्र्यंबक विनायक सरदेशमुख (जन्म २२ नोव्हेंबर, १९१९) यांची गणना आदरानेच करावी लागेल. सरदेशमुखांचे नाव उच्चारले की, का कुणास ठाऊक, पण त्यांच्या कादंबऱ्यांचीच हटकून आठवण येते. यामागील रहस्य खुद्द सरदेशमुख हेच अधिक चांगल्या प्रकारे आपल्या समीक्षीय निपुणतेने उलगडू शकतील. सरदेशमुख हे आता वयाची ऐंशी ओलांडीत आहेत. १९४४ साली 'ससेमिरा' ही त्यांची पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली व १९५५ मध्ये 'उत्तररात्र' हा काव्यसंग्रह प्रकाशित झाला. कविता-कादंबरीच्या वाटेने सरदेशमुखांनी साहित्यक्षेत्रात पदार्पण केले. कवितेची आत्मनिष्ठा व कादंबरीची वस्तुनिष्ठा अशा दोन ऐलपैल तटांच्या मधून वाहत गेलेली त्यांची निर्मिती उत्तरोत्तर परिणत होत जाऊन ज्या सागरापर्यंत येऊन पोहोचली, तो सागर समीक्षेचा होता व आहे. सर्जनप्रवृत्ती व समीक्षाप्रवृत्ती यांचा एक नमुनेदार मिलाफ त्यांच्या साहित्यविमर्शात व सर्जनशील आत्मभानात प्रथमपासूनच घडत राहिल्याचे दिसून येते. आणि त्यांच्या स्वत:च्या सिद्धांतानुसार तर समीक्षावृत्ती ही सर्जनवृत्तीच्या आधी येणारी वा असणारी म्हणजे पूर्वगामी असते. म्हणजे तसे घडणे अर्थातच अपरिहार्यही होते. खरे तर, जीवनात सर्जनशील आत्मनिष्ठा आणि अस्सल सर्जनशील वस्तुनिष्ठा दोन्हीही एकमेकांच्या आधारे, एकमेकांच्या सापेक्षतेनेच विकसित होत जातात. या दोन्ही निष्ठांचे एकात्म बीज म्हणजेच सर्जनशीलतेचा मूल कंद होय. आता मागे वळून पाहिले, तर वाटते की, सरदेशमुखांच्या कादंबऱ्या या समीक्षाच आहेत आणि त्यांची समीक्षा म्हणजे कथने व कविता आहेत. सरदेशमुख निबंधालाही ललित साहित्यकृतीच मानतात. साहित्य व समीक्षा यासंबंधीच्या रूढ कल्पनांना आत्मप्रत्ययाच्या निर्णायक निकषावरच मान्य वा अमान्य करण्याची या मनस्वी लेखकाची मनोवृत्ती लक्षात घेतली, तर त्याच्या साहित्याचे व समीक्षेचे वेगळेपण व वैशिष्ट्य समजावून घेण्यास आपणच आपणास साहाय्य करू शकू, असे मला वाटते.

आपल्या सुमारे अर्धशतकभराच्या वाङ्मयीन कारकीर्दीत सरदेशमुखांनी चार कादंबऱ्या, दोन नाटके, एक काव्यसंग्रह आणि सहा समीक्षाग्रंथ अशी मोजकीच म्हणता येणारी निर्मिती केली. याशिवाय नदीपार (हेरमान हेसे या जर्मन लेखकाच्या 'सिद्धार्थ' या कादंबरीचा अनुवाद) हा अनुवादही (१९५५) त्यांच्या नावावर आहे. मला आठवते त्याप्रमाणे १९५८-५९ मध्ये पु.शि. रेग्यांच्या 'छंद' या द्वैमासिकातर्फे घेण्यात आलेल्या दीर्घ चिंतनपर काव्यरचनेच्या

**त्र्यंबक विनायक सरदेशमुख**
(२२ नोव्हेंबर १९१९)
एम्. ए., बी. टी., सोलापूर

**ग्रंथसंपदा :**

*अ) कादंबऱ्या :*

१) ससेमिरा - १९४४
२) नदीपार (भाषांतरित) - १९५९
३) बखर एका राजाची - १९७२
४) उच्छाद- १९७८
५) डांगोरा एका नगरीचा - १९९८

*आ) काव्य :*

१) उत्तररात्र - १९५५

*इ) नाटके :*

१) टाहो - १९८६,
२) थैमान - १९८६

*ई) समीक्षा :*

१) अंधारयात्रा - १९६८
२) गडकऱ्यांची संसारनाटके - १९७०
३) प्रदेश साकल्याचा - १९७९
४) रामदास : प्रतिमा व प्रवोध - १९८४
५) धुके आणि शिल्प - १९८५
६) शारदीय चंद्रकळा - १९९२

*उ) संदर्भ साहित्य :*

१) सविस्तर मुलाखत : 'धुके आणि शिल्प' या पुस्तकात समाविष्ट
२) ललित मासिक, मुंवई, जून १९९९ अंक

स्पर्धेत त्यांच्या व माझ्या कवितांना विभागून बक्षिस देण्यात आले होते. माझी दीर्घ कविता अजूनही अप्रकाशितच राहिली. मात्र सरदेशमुखांची कविता 'धिंड' या नावाने 'युगवाणी'त (सप्टेंबर १९७२) प्रसिद्ध झाली. त्यांच्या आगामी समीक्षाग्रंथांत 'तुकाराम' व 'स्वातंत्र्योत्तर मराठी नाटक' यांचा, आगामी कादंबरीत 'लाव्हा' या कादंवरीचा व 'कविता हैवानाची' या काव्यसंग्रहाची गणना करता येईल. (संदर्भ - धुके आणि शिल्प, १९८५) कथालेखन मात्र सरदेशमुखांनी केले नाही. सरदेशमुखांचे आणखीही काही साहित्य असले पाहिजे, असे वाटते. त्यासंवंधी त्यांनीच काही सांगितले तर कळू शकेल. कादंवऱ्या व समीक्षा हेच सरदेशमुखांचे मुख्य व महत्त्वाचे लेखनप्रकार ठरले. कवितेच्या पाठलागात हरलेले समीक्षक असू शकतात; पण आपले कविपण न हरवलेले समीक्षकही असतातच असतात. सरदेशमुख हे यांपैकी दुसऱ्या वर्गात मोडतील. महत्त्वाची गोष्ट अशी की, आधुनिक मराठी साहित्यक्षेत्रात काही मान्यवर समीक्षक हे एखाद्या मातब्बर साहित्यप्रकारातील मान्यवर निर्मातेही होते असे दिसून येईल. विशेषत: कादंबरी आणि समीक्षा या दोन्ही प्रकारांना समर्थपणे पेलणाऱ्या लेखकांत वा. म. जोशी, डॉ. केतकर, खांडेकर, फडके, मुक्तिबोध, भालचंद्र नेमाडे इत्यादींबरोवरच सरदेशमुखांचीही गणना करावी लागेल.

'बखर एका राजाची' (१९७२), 'उच्छाद' (१९७८) व 'डांगोरा एका नगरीचा' (१९९८) ही सरदेशमुखांची कादंवरी-मालिका महत्त्वाची आहे. या वावतीत ते म्हणतात, 'या तिन्हींमधून

व्यक्तिगत तशी सामूहिक संसारदु:खाची गाथा उघडून ठेवण्याचा प्रयत्न मी केला आहे. या दु:खाला छेद द्यायला व ते सहन करायला सद्भाव आणि सामंजस्य याहून काहीही सक्षम नाही, हे प्रसंगाप्रसंगांतून आणि व्यक्तिदर्शनातून प्रकट किंवा ध्वनित व्हावं, असा हेतू मी बाळगला;' (ललित जून १९९९, पृष्ठ-२३). सरदेशमुखांचे हे साधे सरळ निवेदन मोठे अर्थपूर्ण आहे. ते अशा दृष्टीने की, व्यक्तिगत व सामूहिक संसारदु:खाची गाथा उलगडणे हे त्यांच्या कादंबऱ्यांचे जसे उद्दिष्ट आहे, तसेच ते त्यांच्या समीक्षेचेही आहे. दु:खमय संसारगाथेला मुळापासून आणि कळत-नकळतपणे उलगडू पाहणारे प्रतिभावंत व त्यांच्या साहित्यकृती हेच सरदेशमुखांच्या समीक्षेचेही विषय ठरलेले आहेत. साहित्यातील व साहित्यिकांच्या प्रकट व प्रच्छन्न अशा अंतर्बाह्य अंधारयात्रेचे सहृदय व शोधक निरीक्षक-मीमांसक अशीच सरदेशमुखांची प्रतिमा आहे. दु:खमय संसारगाथेचा उलगडा एका पातळीवर त्यांना कादंबरीकार करतो आणि दुसऱ्या पातळीवर समीक्षक बनवतो, असे म्हणता येईल. एका दृष्टीने उद्दिष्टांची बहुस्तरीय एकात्मता हे सरदेशमुखांच्या सर्जक आणि समीक्षक अशा दुहेरी भूमिकांचे एक खास वैशिष्ट्य मानावे लागेल.

**पार्श्वभूमी :**

लेखकाच्या चरित्र-चारित्र्याचा काहीएका प्रकारचा उघड व सुप्त संबंध त्याच्या निर्मितीशी असतो. अशाच प्रकारचा संबंध समीक्षकाचे चरित्र-चारित्र्य आणि त्याची समीक्षा यांच्या बाबतीतही असतो. सरदेशमुखांच्या आयुष्यातील अडतीस वर्षे शिक्षक व प्राध्यापक या नात्यांनी अध्यापनक्षेत्रात व्यतीत झाली. याचाच अर्थ, हा प्रदीर्घ कालावधी त्यांच्या जीवनातील एक दक्ष-जागृत अध्ययनपर्वही होते असा आहे. खरे तर, या अध्ययनपर्वाच्या पूर्वोत्तर काळातही हा हाडाचा शिक्षक अभ्यासच अभ्यास करीत राहिला. हा अभ्यास म्हणजे साहित्यातून कितीतरी प्रकारचे, कितीतरी शिकण्याची व शिकवण्याची एक धडपड असते. त्या धडपडीचे खरे केंद्र व परीघ कुठे व कसे असतात, या संबंधीचे एक तत्त्वज्ञान शोधण्याची साधना असते. एका विशिष्ट अर्थाने ते साहित्याचे शैक्षणिक तत्त्वज्ञानच म्हणता येईल. शिक्षक सरदेशमुखांनी याच दृष्टीने आपल्यातील समीक्षक घडविला, असे म्हणता येईल. याचा ढळढळीत पुरावा त्यांच्या समीक्षालेखनातून सहजपणे मिळू शकतो. समीक्षक हा रसज्ञ की सर्वज्ञ, अशा प्रकारचा एक फसवा नाट्यपूर्ण प्रश्न नवसाहित्याच्या प्रारंभीच्या समर्थनपर्वात आपल्या इथे उपस्थित करण्यात आला होता. त्या प्रश्नामागे अर्थातच एक ऐतिहासिक संदर्भ होता. या पर्वातच सरदेशमुखांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचीही जडणघडण होत होती. मात्र आपल्या जडणघडणीत सरदेशमुख हे वरील नाट्यपूर्ण प्रश्नाने चकले नाहीत, हे त्यांचे वैशिष्ट्य मानले पाहिजे. सर्वज्ञताऐवजी आपण बहुज्ञता असे म्हणू वा समजू. रसज्ञता व सर्वज्ञता (म्हणजे बहुज्ञता या अर्थाने) यांत विरोध नसल्याने त्यातून एकाची निवड करण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही, असेच सरदेशमुखांनी मानले आणि त्यानुसार त्या दोहोंची उपासना केली. आपल्या महाविद्यालयीन शिक्षणकाळात त्यांनी व्हिक्टर ह्यूगोचा अंतर्बाह्य धांडोळा घेतला व विपुल गुणवत्ता व विपुल दोषपूर्णता यांचे समीक्षकाला मिळणारे आव्हान जीवनदृष्टीच्या निकषावर कसे पेलावयाचे, यासंबंधी संधा

घेतली. रवींद्रनाथांच्या परिशीलनातून विराट विश्वतत्त्वाशी समरसता पावणारे प्रतिभावंताचे मानस त्यांना उमगले. मुख्य म्हणजे मराठीतील व यूरोपातील थोर साहित्यिकांच्या थोरवीचे रूढ आकलन व मूल्यमापन किती असमाधानकारक आहे, याची जाणीवही त्यांना विपुल वाचनातून व चिंतनातून प्रकर्षाने झाली. मराठी, संस्कृत, इंग्रजी साहित्यांचा त्यांचा व्यासंग व्यापक व चिकित्सक आहे. भारतीय तत्त्वज्ञान व पश्चिमी तत्त्वज्ञान आणि तत्त्वज्ञ यांचा अभ्यास आहे. धर्म, सामाजिक विज्ञाने, इतिहासपुराणे यांचाही व्यासंग काटेकोर आहे. आणि रसज्ञतेला अबाधित ठेवून सर्वज्ञतेचा भार अर्थपूर्णतेने पेलण्याची क्षमताही त्यांच्यात आहे. त्यांची समीक्षा वाचणाऱ्या वाचकाला या गोष्टीचा प्रत्यय आल्याखेरीज राहणार नाही. त्यांच्या एका समीक्षाग्रंथातील (अंधारयात्रा, १९६८) सूचीमध्ये ज्या नोंदी केलेल्या आहेत, त्यातील काही नोंदी सहजपणे उल्लेखिता येतील. त्या नोंदी अशा : अतिवास्तववाद, अरविंद, श्री., अस्तित्ववाद, आइनस्टाइन, आल्बर्ट; उपनिषदे, कर्कगार्ड, कॉनरॅड जोसेफ, काम्यू, आल्बेर; कृष्णमूर्ती जे., कालिदास, गटे, टागोर, रवींद्रनाथ; टॉयनबी, आर्नोल्ड; टिळक बा. गं., थॉमसन, फ्रान्सिस; पाऊंड, एझरा; प्लांक, माक्स; फॉकनेर, विल्यम्स्, बरड्याव्ह, निकोलस; बोदलेर, भवभूती, भावे विनोबा; रसेल, वाइल्ड, ऑस्कर; व्यासमुनी, व्हाइटहेड, शूद्रक, शेक्सपिअर, शंकराचार्य, शेली, हॉपकिन्स, सरदेसाई रियासतकार, इत्यादी. या नोंदी ज्या समीक्षाग्रंथात आहेत, तो समीक्षाग्रंथ हा सरदेशमुखांचा पहिलावहिला समीक्षाग्रंथ होता व तो वयाच्या चाळिशीत असताना ते लिहीत होते. सर्वज्ञतेची उपासना या समीक्षाग्रंथात प्रतिबिंबित झालेली आहे. या उपासनेचे व्यापक दर्शन सरदेशमुखांच्या सध्या तरी शेवटच्या असलेल्या 'शारदीय चंद्रकळा' (१९९२) या समीक्षाग्रंथात घडते. त्यातील एकूण नऊ लेखांपैकी पाच लेख मराठीतर भारतीय व पश्चिमी प्रतिभावंतांवरील आहेत. हे लेख वयाच्या साठीत असताना सरदेशमुखांनी लिहिले आहेत. आधुनिक मराठीत साहित्यिक सर्वज्ञता हा केवळ व प्राधान्याने प्रभावमीमांसेचा चर्चाविषय ठरल्याचे दिसून येते. तो रसज्ञतेचा, समीक्षेचा व साहित्यसिद्धांतनाचा विषय कसा ठरू शकतो, हे सरदेशमुखांनी आपल्या समीक्षेतून दाखवून दिले आहे. समीक्षालेखन हे एकाचवेळी एखाद्या भाषेतील साहित्याशी विशिष्टपणे व विश्वसाहित्याशी साधारणपणे निगडीत असते. साहित्याचे आकलन, आस्वाद व मूल्यमापन एकाच वेळी विशिष्ट व विश्वात्मक कसे ठरते, याची पुरेपूर कल्पना सरदेशमुखांच्या सर्वज्ञ रसज्ञतेतून लिहिलेल्या समीक्षेवरून येऊ शकते. समीक्षेची विशिष्टता व वैश्विकता कशा प्रकारे असते वा घडते, याचा एक नमुना या समीक्षकाच्या लेखनप्रपंचातून प्रकटलेला आहे, हे वाचकाला जाणवल्याखेरीज राहणार नाही. स्वतःच्या बहुसाहित्यिक आकलन-आस्वादाला बहुज्ञानात्मक व्यासंगाने सरदेशमुखांनी लक्षणीय केले आहे. म्हणूनच त्यांची समीक्षा रसात्मक व ज्ञानात्मक अशी दुहेरी घडणीची पण एकात्म शिल्पाकृती वाटते.

ज्यांच्या चरित्रांतून आणि शब्दांतून सरदेशमुखांनी मार्गदर्शन आणि धीर घेतला, त्यांची नावेच त्यांनी नमूद केली आहेत. त्या नामावलीत श्री. म. माटे, डॉ. आंबेडकर, डॉ. रामभाऊ रानडे, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, सानेगुरुजी, तर्कतीर्थ जोशी, जे. कृष्णमूर्ती,

आचार्य रजनीश, कवी कुंजविहारी, कविवर्य बेंद्रे व बाबामहाराज आर्वीकर यांचा समावेश आहे. आपल्यातील जिवट निर्माणशीलता ही आई-वडिलांकडून लाभलेला वारसा आहे, असेही त्यांनी नमूद केलेले आहे. (ललित जून १९९९, पृष्ठे २१,२२) सरदेशमुख हे कुणाकुणाच्या आंतरिक सहवासात वाढत आले, जगत आले आणि वाचनलेखन करीत आले, याची कल्पना त्यांच्या या निवेदनातून येऊ शकेल. त्यांतील एक सर्वांत महत्त्वाचे नाव म्हणजे कवी सरदेशमुख. सरदेशमुखांच्या समीक्षेवरील खरेखुरे सरदेशमुखी वतन या कवीचेच आहे. हा कवी कसा आहे, हे त्यांच्या 'उत्तररात्र' या कवितासंग्रहावरून व 'धिंड' या दीर्घ कवितेवरून कळू शकेलच; पण त्यांच्या काव्यसमीक्षेतूनही कळेल. या बहुविध स्वरूपाच्या आंतरिक सहवासाचे संस्कार सरदेशमुखांच्या चरित्र-चारित्र्याच्या व व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीत कमीअधिक प्रमाणात प्रभावी झालेले असणार हे उघड आहे. त्यांच्या साहित्यात व समीक्षेत उमटलेली वा गर्भित असणारी त्या संस्कारांची रूपे शोधलीच पाहिजेत असे जसे नाही; तसेच असा शोध निर्णायकपणे घेणे शक्यही नाही. याची गरजही, खरे तर, नाही. मात्र सरदेशमुखांच्या समीक्षेच्या प्रेरणा, प्रवृत्ती व ध्येये समजून घेण्यासाठी त्यांच्या चरित्र-चारित्र्याची ही संस्कारक बाजू ध्यानात ठेवणे उपयुक्त ठरते. त्यांच्या समीक्षेचा आरंभबिंदू व अंतिमबिंदू हे जसे आहेत, ते तसेच का असावेत याचा अंदाज त्यामुळे करता येतो व ही बाब समीक्षक सरदेशमुख समजावून घेण्यास महत्त्वाची ठरते.

**समीक्षा आणि साहित्यसंस्कृती :**

सरदेशमुखांच्या एकूण समीक्षेचा अर्थपूर्ण परिचय एखाद्या लेखातून करून देणे किंवा होणे हे केवळ हास्यास्पद नव्हे, तर अन्याय्य ठरणारेही आहे. हा लेख आहे तो मुख्यत: जिज्ञासू व जाणकार यांचे लक्ष वेधण्यासाठी. सातशे वर्षांची समृद्ध परंपरा मराठी साहित्याला आहे. मात्र शे-दीडशे वर्षांची अल्पकालीन आधुनिक समीक्षा-परंपराही महत्त्वाची आणि वाचनीय-मननीय आहे. समीक्षेची जिज्ञासू व उत्सुक वाचकपरंपरा निर्माण होणे, ही आपल्या वाङ्मयीन संस्कृतीची नितांत आवश्यक अशी निकड आहे. समीक्षेचे हे वाचकक्षेत्र केवळ शैक्षणिक व आकादमिक कक्षेपुरतेच राहणे व वाढणे फलदायी ठरणार नाही; तर ते व्यापक समाजक्षेत्राशी समकक्ष होणे गरजेचे आहे. साक्षर, सुशिक्षित, बुद्धिजीवी, व्यावसायिक, विविध बहुजनीय थरांतून पुढे येणारे लेखक-कवी या सर्वांच्या आवाक्यात समीक्षालेखन येणे व आणणे अगत्याचे आहे. समीक्षा व समीक्षक यांची कदर राखणाऱ्या समाजातच समृद्ध साहित्यसंस्कृतीची वाढ व विकास होऊ शकतो. समीक्षेची निर्मिती व आस्वाद यात आस्था असलेला व्यापक वाचकवर्ग ही विकसनशील साहित्यसंस्कृतीची खूणच होय. चांगल्या कथा-कादंबऱ्यांनी व कविता-नाटकांनी जे जे काही देऊ केलेले असते, ते ते सर्व चांगली समीक्षाही देऊ शकते, असा विश्वास समाजात दृढमूल झाला पाहिजे. सरदेशमुखांसारख्या व्रतस्थ व व्यासंगी समीक्षकाची समीक्षा अशा प्रकारचा विश्वास निर्माण करू शकते. आपण स्वत:ला, स्वत: ज्या समाजात जगतो त्या समाजाला आणि स्वत: जे साहित्य वाचतो त्या साहित्याला किती किती प्रकारांनी व पातळ्यांवर अर्थपूर्णपणे समजावून घेऊ शकतो, याची जिव्हाळ्याने पण काटेकोरपणाने

शिकवण देणारी समीक्षा सरदेशमुखांनी सिद्ध केलेली आहे. ती समीक्षा मुख्यत: साकल्याच्या प्रदेशाची, सकळांना उद्देशून केलेली एक सांगोपांग चिकित्सा आहे. ती समीक्षा जिवटपणे जीवन जगणाऱ्यांसाठी व तो जिवटपणा ज्या साहित्यनिर्मितीमधूनही लाभू शकतो, त्या निर्मितीची साथसंगत त्या जगणाऱ्यांना प्राप्त करून देण्यासाठी जन्मली आहे. ती समीक्षा जेवढी साहित्यिक-समीक्षकांसाठी आहे, त्यापेक्षा अधिक ती साहित्यसंस्कृतीचे भान आलेल्या व येणाऱ्या सामान्य माणसासाठी आहे. रूढ साहित्यसमीक्षेच्या प्रणालीत समीक्षा म्हणून ती बसो वा उठो; पण ती समीक्षाच आहे. फार तर आपण तिला जीवनसमीक्षा म्हणू. साहित्य हीदेखील प्रत्यक्षाप्रत्यक्ष जीवनसमीक्षाच असते. त्या जीवनसमीक्षेची समीक्षा दुसरे काय असू शकते? खरे तर, मनुष्यजीवनाची समीक्षा करण्यास साहित्याइतके भरवशाचे साधन माणसाला उपलब्धच नाही, असेही वाटते.

साठोत्तरी कालखंडात मराठी साहित्य व साहित्यविचार सामाजिक-सांस्कृतिक वास्तवाच्या विस्तारणाऱ्या अंतर्बाह्य रूपांकडे वळत होता. रूपवादी प्रभावावाहेर येऊ पाहात होता. सौंदर्यमानवापेक्षा समाजमानव साहित्य-समीक्षेच्या केंद्रस्थानी येत होता. व्यक्तीचे मूल्य अबाधित ठेवूनही साहित्य व समीक्षा यांचे साकल्याच्या प्रदेशाचे भान कसे कसे व कोणकोणत्या अर्थांनी मोलाचे व मूलभूत ठरते, याचाही वेध घेण्याची गरज निर्माण झाली होती. सरदेशमुखांची समीक्षा ही या साठोत्तरी वाङ्मयीन-सांस्कृतिक भानाची एक प्रातिनिधिक अभिव्यक्ती आहे, असे म्हणता येईल.

**समीक्षेतील आस्वादन आणि सिद्धांतन :**

सरदेशमुखांच्या समीक्षासंपदेत 'अंधारयात्रा' (१९६८), 'गडकऱ्यांची संसारनाटके' (१९७०), 'प्रदेश साकल्याचा' (१९७९), 'रामदास : प्रतिमा व प्रबोध' (१९८४), 'धुके आणि शिल्प' (१९८५) व 'शारदीय चंद्रकळा' (१९९२) या सहा पुस्तकांचा समावेश होतो. ापैकी शेवटच्या म्हणजे 'शारदीय चंद्रकळा' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत सरदेशमुख लिहितात :

"साहित्याचे थोरपण आणि समीक्षेची सफलता यांविषयीचे गेल्या चाळीसएक वर्षांत माझ्या नाशी दृढ होत गेलेले काही विचारचिंतन पहिल्या निबंधात मी देत आहे. नंतरच्या आठ खांत ज्या दिग्गजांवर लिहिले आहे, ते त्यांच्या वाग्वैभवाचे समग्र रूप सांगणारे आहे, असे ाही; त्यांच्या प्रतिभेचे माझ्या परीने केलेले ते परिशीलन आहे. प्रामुख्याने गुणविवेचनपर."

प्राक्कथन मोठे अर्थपूर्ण आहे. ते अशा दृष्टीने की, सरदेशमुखांचे चाळीसएक वर्षांच्या ालावधीतील साहित्य-समीक्षाविषयक लेखन व चिंतन एका अटळ व तर्कसंगत रीतीने ाहित्यसमीक्षाविषयक सिद्धांतनात परिणत होत आहे आणि या सिद्धांतनाच्या सजाण-अजाण अशा आंतरिक दबावातून त्यांनी आठ प्रतिभावंत दिग्गजांच्या सर्जनाचा मागोवा घेण्याचा प्रयत्न केला आहे. सिद्धांतनाला एक प्रेरक अशी ऐतिहासिक बाजू असतेच असते; तथापि त्याचा कल इतिहासनिरपेक्ष होण्याकडे अधिक असतो. 'शारदीय चंद्रकळा' वाचताना व वाचून झाल्यानंतर हा समीक्षक इतिहासाबाहेर पडलेला, स्वान्त:सुखाय पर्यायी साहित्यसृष्टीत रमलेला, स्वत:च्याच व्यक्तिगत साहित्यप्रचितीचे अध्यात्म रचू लागलेला आणि साहित्य व

समीक्षा यांची निर्मिती, स्वरूप, आकलन, आस्वाद व गुणवर्णन इत्यादींसंबंधाने स्वत:चे एक प्रारूप साकारू पाहणारा असा कुणीतरी समीक्षक आहे, असे वाटू लागते. अशा वाटण्यात एक प्रकारच्या कलावादी स्वायत्ततेची गंभीरशी भूमिकाही असावी किंवा काय, असेही वाटणे मिसळून जाते. सर्व प्रकारच्या सैद्धांतिक साहित्यविचारातील त्रुटी व मर्यादा प्रथमपासून दर्शवित आणि त्यांना नाकारत जाणारा हा समीक्षक पुन्हा आपले चिंतन काहीएका तत्त्वप्रचुर चौकटीतच प्रकट करण्यास प्रवृत्त झाला की काय, असेही मनात येत जाते. प्रतिभावंत व प्रतिभासंपन्न साहित्यनिर्मिती यांचे आकलन व आस्वाद हे सरदेशमुखांसारख्या व्यासंगसंपन्न, चिकित्सक व स्वतंत्र दृष्टीच्या समीक्षकाच्या आत्मप्रचितीच्या, स्वसंवेद्यतेच्या मुशीतून बाहेर पडतात, व त्यामुळे आकलन-आस्वादाची साध्यसाधने विस्तारतात आणि संपन्नही होत जातात, हे खरेच आहे. परंतु याच टप्प्यावर सिद्धांतनाची एक कांचनवाटही फुटलेली असते. तिचा मोह स्वाभाविकही असतो व अनावरही ठरतो. खरे तर जातिवंत समीक्षावृत्तीची तर्कसंगत परिणती सिद्धांतन हीच असते. मात्र आकलन-आस्वादाच्या सर्जनशील विश्लेषणात समीक्षकाने जे मिळवलेले असते, ते सिद्धांतनाच्या कांचनवाटेवर गमावण्याचाही धोका संभवतो. सरदेशमुखांचा 'प्रदेश साकल्याचा' हा निबंध (प्रदेश साकल्याचा-१९७९-पृष्ठे १२९-१७८) वाचताना या प्रकारचा धोका त्यांनी बराचसा सावधपणे हाताळल्याचे जाणवते; मात्र स्व-रूप आणि साहित्य हा 'शारदीय चंद्रकळा'मधील निबंध वाचताना ते अधिक बिनधास्त झाल्याचे जाणवते.

सरदेशमुखांच्या साहित्यविषयक सिद्धांतनात एक अर्थपूर्ण विरोधाभास आहे, असे वाटते. साकल्याचा प्रदेश हा एका व्यक्तिसंज्ञेचा प्रदेश असतो, असा हा विरोधाभास आहे. व्यक्तीचे आत्मरूप हेच साकल्याचे रूप, स्वसंवेद्यता हीच सकलसंवेद्यता, अशा प्रकारचे हे सिद्धांतन आहे. मात्र हा वरवरचाच विरोध आहे, हेही जाणवते. शेवटी साहित्य हे व्यक्तीचे सर्जन असते. काव्यात्मता हे सर्जनशील व्यक्तीचे एक महत्त्वाचे शक्तिसाधन. त्या साधनाधारे व्यक्तीचे सर्जन हे साकल्याचा प्रदेश प्रकाशित करते. सरदेशमुखांच्या तात्त्विक मांडणीचे स्वरूप प्राधान्याने एका रोमँटिक प्रवृत्तीचे आहे. व्यक्तिगत संवेद्यतेचेच कैवल्य पण समग्रतेच्या प्रदेशातून साध्य करणे, असे काहीसे गूढवादी रोमँटिक अधिष्ठान सरदेशमुखांच्या साहित्य-समीक्षा विचारात दिसते. मात्र ही मांडणी त्यांनी आपल्या व्यापक व विदग्ध व्यासंगातून खूपच मूर्त स्वरूपात प्रभावीपणे केलेली आहे. ती वाचणे हा एक मोठाच बौद्धिक आनंद ठरतो, हे सांगितलेच पाहिजे.

मानवी अस्तित्वातील अटळ दुःखमूलता, शोकात्मता हे सरदेशमुखी समीक्षेचे अढळ लक्ष्य आहे. मनुष्यजीवनातील अंधारयात्रेचा शोधबोध घेणे हेच साहित्याचे व समीक्षेचे लक्ष्य ठरते. ही भूमिका प्राधान्याने पश्चिमी आहे, किंवा आधुनिक आहे; भारतीय नाही हे खरेच आहे. ती प्राधान्याने व तत्त्वगंभीर अर्थाने निराशावादीही आहे, असे म्हणता येईल. भारतीय जीवनदृष्टीशी असलेला सरदेशमुखी समीक्षेचा हा अंतराय आपल्या परंपरेत कितपत व कसा ग्राह्य वा स्वीकारार्ह ठरतो, हा गुंतागुंतीचा अभ्यास ठरतो. मात्र त्याचे महत्त्व तेवढ्यामुळे कमी होते, असे म्हणता येणार नाही.



अनुक्रमणिका

**सरदेशमुखांची काव्यसमीक्षा :**

सरदेशमुखांच्या उपलब्ध समीक्षेत कवी, कविता, काव्यतत्त्वे व काव्यात्म जीवनदृष्टी यांनाच सिंहाचा वाटा लाभलेला आहे. केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज, मर्ढेकर या कवींच्या 'अंधारयात्रेचे' विवेचन ते आपल्या 'अंधारयात्रा' (१९६८) या पुस्तकात करतात. कविमनाच्या आकांक्षा व त्याच्या पर्यावरणाचे वास्तव यांच्यातील अंतरायाचा, विसंवादाचा, संघर्षाचा काळोख प्रकाशित करणारी ही अंधारयात्रा आहे. याच पुस्तकात कवितेच्या विविध तत्त्वांचा व घटकांचाही विस्तृतपणे वेध घेण्यात आलेला आहे. कवितेतील परतत्त्वस्पर्श, नवता, वास्तव, नवी जाणीव हे विषय नवकाव्याच्या प्रभावकाळाच्या ऐतिहासिक संदर्भात स्पष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. कवितेतील नवता ते परा-जाणिवेच्या (सुमा-कॉन्शसनेस) प्रस्फुरणांत मानतात. संत व कवी म्हणून रामदासांच्या प्रतिमेचा व प्रबोधाचा नव्याने व कृतप्रत्ययाने वेध घेताना (रामदास : प्रतिमा व प्रबोध-१९८४) सरदेशमुख रामदासी रचनांनाच मर्मलक्ष्मी अर्थपूर्णतेने हाताशी धरतात. रामदास कवी नसते, तर केवळ प्रबोधनकार म्हणून त्यांची प्रतिमा नव्याने पुन:प्रस्थापित करण्याचा प्रयत्न बहुधा सरदेशमुखांनी केला नसता, असे म्हणणे फार चुकीचे ठरू नये. 'धुके आणि शिल्प' (१९८५) या पुस्तकात ग्रेसवरील दोन लेख आहेत. त्याचप्रमाणे नारायण सुर्वे, विद्याधर वैद्य, गडकरी व त्यांच्यातील कवित्व, दलित कविता यांचा मागोवा घेतलेला आहे. या मराठी कवी व कविता यांच्यावरोवरच एमिली डिकिन्सन या इंग्रजी कवयित्रीच्या व्यक्तिमत्त्वाचा व रचनांचाही परामर्श घेतलेला आहे. शरद्‌चंद्र मुक्तिबोध, कुसुमाग्रज हे मराठी कवी 'शारदीय चंद्रकळा'(१९९२) यात आलेले आहेत. तर महाकवी बेंद्रे (कन्नड) आणि ह्यूगो, हरमान हेसे, ब्रेख्त इत्यादी यूरोपीय प्रतिभावंतांच्या काव्यात्म जीवनदृष्टी यांचा विश्लेषक अभ्यासही याच पुस्तकात आहे.

सरदेशमुखांच्या एकूण काव्यसमीक्षेची चिकित्सा अर्थातच इथे अभिप्रेत नाही. तिच्यातील काही ठळक बाजू सहजपणाने लक्षात येतात व म्हणून सांगताही येतात. एक म्हणजे कवी व कविता यांची व्यक्तिनिष्ठ म्हणजे सरदेशमुखनिष्ठ निवड. या निवडीमागे ऐतिहासिक संदर्भाच्या निवडीपेक्षा व्यक्तिगत आवड व आस्वाद्यता यांचा प्रभाव अधिक आहे. काही मूलभूत वा समाईक असे अंत:सूत्र असणे, हेही या काव्यसमीक्षेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. ही अंत:सूत्रे वा तत्त्वे केवळ कवितेच्याच क्षेत्राशी संवधित व तिच्याच क्षेत्रातून आलेली अशी नसून ती साहित्याच्या व मनुष्यजीवनाच्या समग्र व सकळ परिघातील व त्या परिघाशी निगडीत असलेली आहेत आणि हा साकल्याचा प्रदेश मनुष्यजीवनाच्या ऐहिक व आध्यात्मिक स्वरूपाशीही जखडलेला आहे. आणि हे अवघे ब्रह्मांड सरदेशमुखांच्या आत्मप्रत्ययावर अधिष्ठित आहे. आत्मप्रत्ययाचे हे अढळ अधिष्ठान हे सरदेशमुखांच्या समीक्षेचे बलस्थानही आहे आणि दुर्बलस्थानही आहे, असे म्हणता येईल. सरदेशमुखांच्या काव्यसमीक्षेत संवेदनप्रियता, संरचनाप्रियता, लय व नाद, आकृतिप्रियता, आशयनिरपेक्ष सौंदर्यप्रियता इत्यादी बाबींची जाण दिसत असली, तरी त्यांना फारसे महत्त्व दिल्याचे जाणवत नाही. एक प्रकारची काव्यात्म अध्यात्मप्रियता म्हणता येईल, तशी ती त्यांच्या काव्यसमीक्षेत जाणवते. खोल खोल जाण्याकडे

कल असलेले आत्मप्रत्ययाचे बोलणे अखेर आध्यात्मिकच होऊ लागते. मूर्ताकडून अमूर्ताकडे व अमूर्ताकडून पुन्हा मूर्ताकडे येजा करण्याच्या गहन गहिऱ्या वैचारिकात ते रंगून जाते. संवेदना व भावना यांच्या विविध प्रकारच्या रूपांकडे वा रूपबंधांकडे हरखून पाहणे सरदेशमुखांना जमतेच; पण त्यापेक्षा सर्जनशील अशा काव्यात्म संवेदनशीलतेचे काही नमुने शोधणे, पाहणे व स्वीकारणे त्यांना मनापासून आवडते. त्यांची काव्यसमीक्षा ही अशा त्यांच्या आवडणाऱ्या व हव्याशा वाटणाऱ्या संवेदनशीलतेच्या नमुन्यांचे दर्शन घडवते. याला एक प्रकारचे काव्यात्म अध्यात्म म्हणावयाचे ते एवढ्याच अर्थाने की, सरदेशमुखांचा प्रचंड वाङ्मयीन व्यासंग, त्याचे मार्मिकपणे केलेले उपयोजन, त्यामुळे विधानांना व निरीक्षणांना लाभणारी प्रभावी प्रत्ययकारिता आणि कविकवितांच्या आत्मतत्त्वांकडे कळत-नकळतपणे पण अटळपणे ओढला जाणारा वाचक या सर्व गोष्टी ही काव्यसमीक्षा साधून जाते. कवी आणि कविता यांना आतून समजून घेतल्याचा आणि बाहेरून समजून घेण्यातील एकांगीपणा व फसगत लक्षात आल्याचा एक ठाम अनुभव सरदेशमुखांची ही काव्यसमीक्षा देते. सर्वसाधारणपणे आपणास माहीत असते, त्या प्रकारची ही काव्यसमीक्षा नाही; सर्वसाधारणपणे जशी मांडली जाते, तशी मांडलेली ही काव्यसमीक्षा नाही आणि सामान्यतः काव्यसमीक्षा जे देते ते बरेचसे नाकारणारी ही समीक्षा आहे, हे नक्कीच वाचकाला जाणवते. पण याचबरोबर हेही जाणवते की, ही काव्यसमीक्षा कवी-कविता-काव्यपरंपरा व काव्यतत्त्वे यांच्याबद्दलची आपली मर्मदृष्टी अधिक डोळस, अधिक चौकस व अधिक संपन्न करते. साहित्यसमीक्षेत ज्याप्रमाणे आपण अधिसमीक्षा म्हणजे मेटॅक्रिटिसिझम म्हणून एक प्रकार मानतो वा करतो, त्याच धर्तीवर बोलावयाचे, तर सरदेशमुखांची काव्यसमीक्षा ही आस्वादक समीक्षेतील एक प्रकारची मेटॅक्रिटिसिझम आहे, असे म्हणता येईल. सरदेशमुखांची व्यक्तिगत आवडनिवड व व्यक्तिगत अशी तत्त्वगर्भ जीवनदृष्टी यांच्या कक्षेबाहेर ही काव्यसमीक्षा पडत नाहीसे दिसते. म्हणूनच आस्वादक समीक्षेचाच पण एक खास सरदेशमुखी मानदंड असे तिचे वर्णन करता येईल. काव्यनिर्मितीच्या क्षेत्रातील वैशिष्ट्यपूर्ण सर्जनशील संवेदनशीलता जशा आपापल्या परीने मौलिक असतात, त्याचप्रमाणे काव्याच्या आस्वादन-क्षेत्रातील सरदेशमुखांची संवेदनशीलता वैशिष्ट्यपूर्ण व तिच्या अधिकारात म्हणूनच मोलाची ठरते.

**संतकवी रामदासांची पुनःस्थापना :**

सरदेशमुखांचे 'रामदास : प्रतिमा व प्रबोध' (१९८४) हे पुस्तक फार महत्त्वाचे आहे. संत हे मराठी समाज, संस्कृती व साहित्य यांचे शिल्पकार आहेत, असे त्यांच्याकडे वळून पाहताना सर्वच आधुनिकांना रास्तपणे जाणवते. मात्र गेल्या सुमारे दीडशेएक वर्षांतील आधुनिकांची संतचिकित्सा पुरेशी वास्तव, वस्तुनिष्ठ व सशास्त्रीय नाही हेच मुख्यतः लक्षात येते. प्रत्येक संताला आपापल्या परीने वा सांप्रदायिक दृष्टीने स्वीकारण्याचे व नाकारण्याचे प्रयत्न होत राहिले. त्यामुळे मराठी समाज-संस्कृतीच्या साकल्याच्या प्रदेशाचे परिप्रेक्ष्य त्या प्रयत्नांतून हरवल्याचे लक्षात येते. या फसगतीचे भान स्वातंत्र्योत्तर कालखंडात हळूहळू अधिकाधिक तीव्रतेने येत गेल्याचे दिसते. पण यातही पुन्हा एक गोम राहिलीच. नवसाहित्याच्या उदयानंतर

स्थिरपद होऊ लागलेल्या शुद्ध वाङ्मयीन अभिरुचीतून संतांचे संतपण त्यांच्या काव्यापासून अलग करण्यात आले व केवळ काव्याचीच कलात्मक वा विदग्ध मूल्ये प्रस्थापित करण्याचा प्रयत्न झाला. मात्र गेल्या वीसपंचवीस वर्षांच्या कालखंडात परिवर्तनवादी विचारव्यूहाचे, देशीवादी जाणिवांचे प्रभाव वाढले व त्यांतूनच संतकार्याच्या व संतकाव्याच्या मूल्यशोधनाची अधिक समग्र व अधिक सशास्त्रीय दृष्टी निर्माण झाली. संतांच्या कार्याचा, साहित्याचा नव्याने व समग्र सांस्कृतिक परिप्रेक्ष्यात विचार होऊ लागला. संतचिकित्सेच्या या नव्या पर्वातही तुकोबांनाच प्राधान्य मिळाल्याचे दिसते. या पार्श्वभूमीवर सरदेशमुखांची रामदास-चिकित्सा लक्षणीय ठरते, असे म्हटले पाहिजे.

रामदासांची प्रतिमा विकृत स्वरूपात प्रतिष्ठित झालेली आहे. याची कारणे जशी ऐतिहासिक परिस्थितीत आहेत, तशीच ती राजवाड्यांसारख्यांच्या एकांगी व हटवादी भूमिकेतही आहेत. सरदेशमुखांनी रामदासांना वास्तव वस्तुनिष्ठ स्वरूपात पुन:प्रस्थापित करण्याची प्रभावी मांडणी केलेली आहे. ही मांडणी डॉ. सदानंद मोरे यांच्या 'तुकारामदर्शना'प्रमाणे व्यापक व समग्र नाही हे खरे; पण तशा प्रकारच्या व्यापक व समग्र मांडणीची अधिष्ठानभूत सूत्रे सरदेशमुखांच्या छोट्या प्रबंधात निश्चितच आहेत. व्यापक रामदासदर्शनाचे काम खरोखरच कुणीतरी करावयास हवे, असे वाटते. सामाजिक-सांस्कृतिक परिवर्तन, पुरोगामित्व या संकल्पनांचे सरदेशमुखांनी केलेले अर्थ हेच आपल्या देशीय सत्त्वधारांशी अधिक सुसंगत ठरतात. सरदेशमुखांच्या परिप्रेक्ष्यात रामदासांना ओळखणे म्हणूनच खूप वेगळे व अधिक अर्थपूर्ण ठरते. मुख्य म्हणजे प्रचितीवादी अध्यात्मनिष्ठा, या निष्ठेमधील पुरोगामी मानवी शक्तींना गती देण्याची क्षमता, धर्म व मानवधर्म यांच्यातील विधायक क्रियाशील नाते, 'जनीं जनार्दन' हे तत्त्व, जितुके देह तितुकी देउळे हा स्फोटक अर्थ, प्रपंच व परमार्थ यांच्यातील एकात्मता यांसारख्या तत्त्वसूत्रांचा सरदेशमुख आधार घेतात; तेव्हा रामदासांची प्रतिमा व प्रबोध यांना निर्विवादपणे एक सद्य:कालीन प्रस्तुतता लाभते. या रामदासमीमांसेच्या रूपाने सरदेशमुख हे पुन्हा एकदा कवित्व, संतत्व आणि मनुष्यजीवनाचे मौलिक आध्यात्मिक व ऐहिक संवेदन व आकलन यांचा मेळ घालतात. सर्जनशील आत्मभान व जीविताचे वस्तुभान यांचे एक आवडते प्रारूप (मॉडेल) उलगडून ठेवतात.

**सरदेशमुखांची तत्त्वमीमांसक समीक्षा :**

साहित्याची तत्त्वे व तत्त्वज्ञान यासंबंधीही सरदेशमुखांनी आपली मांडणी केलेली आहे. 'प्रदेश साकल्याचा' (१९७९) हे त्यांचे पुस्तक या संदर्भात महत्त्वाचे आहे. सैद्धांतिक समीक्षेवर भर असलेले इतरही काही निबंध त्यांनी लिहिलेले आहेत. त्यात स्व-रूप आणि साहित्य हा लेख ('शारतीय चंद्रकळा, १९९२), कवितारूपाची मीमांसा करणारा सात निबंधांचा दुसरा भाग (अंधारयात्रा, १९६८) त्याचप्रमाणे धुके आणि शिल्प (१९८५) या पुस्तकातील काहीसा तत्त्वदर्शक वळणाचा दलित काव्यावरील लेख यांचा समावेश होईल. खरे तर सरदेशमुखांची आस्वादक समीक्षा ही तत्त्वप्रवणच आहे. साहित्यकृतीच्या व साहित्यिकाच्या आत्मप्रत्ययाचे विश्लेषण करताना ते विश्लेषण काहीएका तत्त्वप्रधान वा विचारप्रधान अंत:सूत्रात वा चौकटीत

राखण्याचा सरदेशमुख प्रयत्न करतात. तथापि 'प्रदेश साकल्याचा' यासारखे लेखन मुख्यत: सिद्धांतनाच्याच हेतून केलेले आहे.

''साहित्याची प्रियता आणि कल्याणकारिता कोणत्या मूल्यांशी जोडलेली, त्याचे नवेपण आणि सनातनत्व कोणत्या गुणलक्षणांत, समीक्षेशी त्याचे नाते किती हार्दिक वा उपरे, सत्याचे अनुसंधान व समग्रतेचे भान ही दोन्ही साहित्याला व समीक्षेला थोरपण कशी देतात... इत्यादींचा विचार कित्येक वर्षे करीत आलो. ते विचारमंथन मांडताना रूढार्थाने ही काटेकोर समीक्षा होत आहे की नाही, याची फिकीर मी केलेली नाही. आपल्या येथील समीक्षेचा अंगचोरपणा वा बुजरेपणा मला त्याज्य वाटतो. तिची एकदेशीयता व तिचे निव्वळ तर्कपांडित्य निष्फळ वाटते.'' - 'प्रदेश साकल्याचा' या पुस्तकातील प्रास्ताविकात सरदेशमुखांनी हे प्रतिपादन केले आहे. त्यातून त्यांच्या सैद्धांतिक समीक्षादृष्टीचे स्वरूप काहीसे स्पष्ट होते : एक म्हणजे सरदेशमुखांची साहित्यतत्त्वमीमांसा रूढ मळवाटेने जाणारी नाही. या रूढ समीक्षेत अंगचोरपणा, बुजरेपणा, एकदेशीयता आणि निव्वळ व निष्फळ तर्कपांडित्य आढळते, असे त्यांना वाटते. आपले साहित्यसिद्धांतन दीर्घकालीन चिंतन-मननातून प्रेरित झालेले आहे, सत्याचे अनुसंधान व समग्रतेचे भान साहित्य आणि समीक्षा या दोहोंनाही थोरपण प्राप्त करून देतात, ही त्यांच्या साहित्यतत्त्वसारणीची भूमिका आहे.

या पुस्तकातील सहा लेखांतून सरदेशमुखांनी जे तत्त्वप्रतिपादन केले आहे, त्याची शहानिशा इथे करावयाची नाही. मात्र ही मांडणी स्वतंत्र, असांकेतिक, विचारप्रवर्तक व म्हणून मोठीच अभ्यसनीय ठरते, हे सांगितलेच पाहिजे. या सहा लेखांपैकी 'समयुगीन सन्मुखता' व 'प्रदेश साकल्याचा' हे लेख विशेष महत्त्वाचे आहेत. सरदेशमुखांचा हा तत्त्वशोधक विमर्श म्हणजे एक भारावून टाकणारे वैचारिक ब्रह्मांड आहे. प्रदेश साकल्याचा ही मुळात एका कविमनाची स्वप्नप्रतिमा आहे. ती साक्षात वास्तवता करण्याची सरदेशमुखांची व्हिजन हीदेखील कविमनाच्याच पण समीक्षकाची स्वप्नप्रतिमा म्हणता येईल. साहित्य व समीक्षा यांच्या साकल्याच्या प्रदेशात काय नाही? सगळेच सर्व आहे. त्यात धर्म, समाज, संस्कृती, इतिहास, तत्त्वज्ञाने, अध्यात्म, आंदोलने, परिवर्तने, विज्ञान, कला सर्व काही आहे. सरदेशमुखांचा साकल्याचा प्रदेश म्हणजे इहलौकिकता व अध्यात्म यांचा एक एकात्म यूटोपियाच आहे. सत्याचे अनुसंधान व समग्रतेचे भान या दोन्ही संकल्पना एवढ्या प्रसरणशील आहेत, की त्यांच्यावर आरूढ झालेले साहित्यसमीक्षाचिंतन सर्व दिशांनी पांगत-पसरत जाते. या प्रसरणाचा वेग व गती आणखीनच वाढत जातात; कारण सरदेशमुखांचा प्रचंड व्यासंग, त्यांची बहुज्ञता आणि तिचा चपखलपणे केलेला मार्मिक वापर ! इथे साहित्य व समीक्षा यांची रूपे गीतेतल्या विश्वरूपदर्शनासारखी विराट होत जातात व ती पाहताना आपण भांबावूनही जातो. साहित्य व समीक्षा यांची देखणी व दृश्य सगुणता विराटतेच्या झगझगाटात लोपू लागते, विरू लागते. साहित्य आणि समीक्षा यांच्यातून लाभलेला सरदेशमुखांचा आत्मप्रत्यय हा त्यांच्या आत्मिक क्षमतेमुळे त्यांच्यापुरती तरी एक ब्रह्मप्रचिती ठरते. आणि या ब्रह्मप्रचितीचा व्यवस्थितपणे व संपूर्णपणे उलगडा करण्याचे भाषिक -वैचारिक सामर्थ्य व कसब त्यांना लाभलेले आहेच.

स्वसंवेद्य अरूपाला वा आत्मरूपाला रूपास आणावयाचे, तर ज्ञानेश्वरीचे अवघे शैलीसर्वस्व स्वीकारावेच लागते. सरदेशमुखही यास फारसे अपवाद ठरत नाहीत. रूढार्थाने ही काटेकोर समीक्षा ठरते किंवा नाही, ही शंका आपल्या प्रास्ताविकात सरदेशमुखांनी व्यक्त करून ती झिडकारूनही टाकली आहे. पण ही समीक्षाच आहे. दुसरे काय ती असू शकते? साहित्य व समीक्षा दोन्हीही मनुष्यजीवनाच्या कलात्मक दर्शनाशी समकक्ष आहेत. प्रचंड गुंतागुंतीच्या व व्यामिश्रतेच्या गहनगूढ जीवनदर्शनाची ठराविकच रूपे व पद्धती असतात, हे मानणे न्याय्य नाही. त्याचप्रमाणे साहित्य आणि समीक्षा यांच्या मुळाशी सर्जनशील व्यक्तिमनच असते आणि हे व्यक्तिमन अनुप्रेडिक्टेबल, अगाध, अमोघ असते. तर त्याच्या संकेतदत्त साचेवंद आविष्कारांची मातब्बरी ती किती मानायची व त्यांच्या ठराविक चौकटींचा मुलाहिजा तरी किती राखायचा? मौलिक बात आहे ती, सरदेशमुख नावाच्या सर्जनशील मनाची, संवेदनशीलतेच्या एका नमुन्याची ! हा नमुना मोलाचा आहे. आपला खरा बुजरेपणा यात आहे की, आजउद्या अनेक सरदेशमुख निर्माण होतील व साहित्य आणि समीक्षा यांचे स्थिरपद झालेले मनोरे त्यामुळे गदागदा हलू लागतील. समजा असे होणारच असेल, तर ते कोण रोखू शकणार? आणि रोखले नाही तरी खरोखरच काय बिघडणार? खरी गोष्ट अशी आहे की, अनेक सरदेशमुख निर्माण होण्याची आशंका अनाठायी आहे. सरदेशमुख हे एकच एक राहतील, अशीच सरदेशमुखी जडणघडण आहे. शक्यता आहे, ती तोतया सरदेशमुखांची. त्यांचा वंदोवस्त करणे मराठीसारख्या प्रगतिशील साहित्यसंस्कृतीला अवघड वाटू नये.

एवढे म्हणून झाल्यानंतर मात्र एक मुद्दा नमूद करणे आवश्यक ठरते. सरदेशमुखांचे साहित्य-समीक्षाविषयक सिद्धांतन हे मुळात प्रचितीवादी असल्याने त्याच्या तार्किक खंडनमंडनास संधीच उपलब्ध नाही. म्हणूनच त्यास सरदेशमुखी वाङ्मयीन अध्यात्म म्हणावयाचे. तरीही एक विचार येतोच : जीवनाकडून भाषिक सर्जनाकडे येणे म्हणजे साहित्य आणि साहित्याकडून पुन्हा परत जीवनाकडे येणे म्हणजे समीक्षा. या उलटसुलट वाटांवरील प्रयासात गोम आहे ती अस्सलपणाची. अस्सल जीवन, अस्सल भाषिक सर्जन, अस्सल सर्जनाकडून अस्सल जीवनसमीक्षा ! प्रश्न निर्माण होतो, तो जेव्हा साहित्य हे साहित्याकडूनच येते तेव्हा आणि समीक्षा ही जीवनाकडूनच जीवनाकडे येते तेव्हा. दुसऱ्या भाषेत बोलावयाचे तर साहित्यिक जेव्हा निर्मितिपूर्व काळात मनुष्यजीवन वाचतो, ते वाचन वाचनविषय झालेल्या मनुष्यजीवनापेक्षा केवळ कल्पनेने (अनुभव व जाणिवांनी नव्हे) अधिक वा जादा केलेले असेल, तर ते साहित्य फसते. आणि समीक्षक जेव्हा साहित्य वाचतो, तेव्हा ते वाचन वाचनविषय झालेल्या साहित्यापेक्षा कल्पनेने वा आत्मप्रत्ययाने अधिक वा जादा झालेले असेल, तर ती समीक्षाही चकते. सरदेशमुखांच्या समीक्षेत वाचनविषय व वाचन यांच्यातील तफावतीचा प्रश्न जाणवतो. समीक्षेने साहित्याकडून जीवनाकडे यावे हे ठीकच; पण या वाटचालीत ते साहित्यच वाटाड्या असावे. सरदेशमुख वाटाड्याचे काम साहित्याकडून स्वत:कडे घेतात व मग त्यांची समीक्षा त्या साहित्याची न राहता खुद्द त्यांच्या स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाची ठरते. आपल्या समीक्षाविषय झालेल्या साहित्यात सरदेशमुख खूप खूप वाचतात व ते खूप खूप म्हणजे बहुधा स्वत:चेच

स्वत:ने केलेले वाचन असते.

सिद्धांतातील अवतरणबहुलता तसेच अन्वय-व्यतिरेक विशद करणारे दृष्टांत, उदाहरणे, प्रसंग हेही सरदेशमुखांच्या समीक्षेचे एक सहजपणे लक्षात येणारे वैशिष्ट्य आहे. त्या विपुल उद्‌धृतांचे व अन्वय-व्यतिरेकांचे स्रोतही विविध ज्ञानविषयांतील आहेत. सरदेशमुखांच्या गाढ व चिकित्सक व्यासंगाचे प्रतिबिंब त्यातून दिसते व आपले मन आदरभावनेने स्तिमितही होते. ही विवेचनाची शैली असांकेतिकच म्हटली पाहिजे. कारण तिच्यात रूढ प्रदर्शनप्रियता मुळीसुद्धा नाही. तिच्यात एक कविसुलभ अधिरता व अनावरता जाणवते. अवतरणे तर अशी अपूर्व व आशयगच्च की, ती ज्या विचारांच्या अनुषंगाने येतात, त्या विचारांचेच विस्मरण होऊ पाहते. खरे तर, सरदेशमुखांच्या समीक्षेतील अवतरणे हा स्वतंत्र अभ्यासाचाच एक उद्‌बोधक विषय ठरेल, असे काहीसे गमतीने व थोड्याशा गंभीरपणाने म्हणता येईल. विधाने व अवतरणे यांचे प्रमाणभूत प्रमाण कोण व कसे ठरविणार? या दोहोंच्या एका वैशिष्ट्यपूर्ण प्रमाणाचा नमुना मात्र सरदेशमुखांच्या समीक्षेत दिसून येतो. अवतरणांची ओढ असलेली व अवतरणांकडेच ओढून नेणारी सरदेशमुखांची समीक्षा म्हटली, तरी तिचेही एक सामर्थ्य व सौंदर्य आहेच आहे. साहित्य व समीक्षा यांच्या साकल्याच्या प्रदेशाची जाणीव करून देणारे ते विचारसामर्थ्य व विचारसौंदर्य आहे. समीक्षावाचनाच्या आपल्या जडलेल्या सवयी व वृत्ती जरा लवचिक केल्या, तर त्या विचारसौंदर्याचे आकलन करता येईल व तारतम्याने त्यास स्वीकारताही येईल. आपल्या मराठी समीक्षेत अंगचोरपणा आहे, बुजरेपणा आहे, एकदेशीयता आहे, तथा निव्वळ तर्कपांडित्य आहे, असा सरदेशमुखांचा आक्षेप आहे. म्हणूनच त्यांची अवतरणबहुल समीक्षा नाकारायची, तर त्यांचे हे आक्षेप समर्थित करणे ठरते. ती स्वीकारायची, तर ते आक्षेप खरे नाहीत व म्हणून ज्या पूर्वग्रहातून सरदेशमुख समीक्षालेखनाचे प्रस्थान ठेवतात, तेच खोटे ठरणे असे होते. हा पेच असो-नसो, सरदेशमुखांचे अवतरणबहुल समीक्षेचे प्रारूप मौलिक व स्वतंत्र म्हणून स्वीकारणेच योग्य व न्याय्य ठरते.

सरदेशमुखांच्या आस्वादक-औपपत्तिक समीक्षेच्या संदर्भात आणखी एक प्रश्न जाणवतो. तो प्रश्न समीक्षकाच्या व्यक्तिगत आवडीनिवडीचा. 'शारदीय चंद्रकळा' (१९९२) या पुस्तकाच्या प्रास्ताविकात सरदेशमुख लिहितात : ''आपली आवड-निवड दडवून ठेवतो, तो समीक्षक विश्वासार्ह नव्हे हे बर्नार्ड शॉचे तसेच इझरा पाउंडचे मत मला मानवते. आपल्या मनाचे कल लपवू गेल्यास वाचकांशी संवादाला खोट येते, असे मला वाटते.''

सरदेशमुखांचे हे मनोगत विचाराला झंकारणारे आहे. आवड-निवड या नामाला साहित्यविषयक असे वा त्या अर्थाचे कसलेही विशेषण सरदेशमुख लावत नाहीत. याचा अर्थ आवड-निवड ही केवळ साहित्यापुरती सीमित नाही. तिच्यात साहित्यबाह्य अशा अनेक व सगळ्याच गोष्टी वा विषय समाविष्ट होतात. याचा अर्थ एवढाच की, समीक्षेत समीक्षक आपल्या ज्या ज्या आवडीनिवडी दडवून न ठेवता उघड करतो, त्या त्या आवडीनिवडी व्यापक साकल्याच्या प्रदेशातील विषयांच्या बाबतीत असतात वा संभवतात. ही दृष्टी प्राधान्याने आस्वादक समीक्षेच्या बुडाशी असते व तिच्यावरील आक्षेपालाही कारण होते. साहित्यकृतीचे










आकलन-आस्वादन करताना जे जे भावतरंग व विचारतरंग उठतात, त्यांना त्या साहित्यकृतीच्या जलाशयाच्या मर्यादा असतात वा पडतात. ह्या जलाशयाचे काठ ओलांडून साकल्याच्या प्रदेशातील विस्तृत जलसागरात ते भावतरंग वा विचारतरंग फैलावू लागले, की मग प्रश्न निर्माण होतो. पण या प्रश्नाची दखल घेणे सरदेशमुखांच्या भूमिकेत बसत नाही.

समीक्षकाला खरोखरच व्यक्तिगत आवडीनिवडी असतात काय? आस्वादक काय आणि तात्त्विक काय, दोन्ही प्रकारच्या समीक्षांत समीक्षकाच्या व्यक्तिगत आवडीनिवडी महत्त्वाच्या की व्यक्तिगततेचा निरास केलेल्या आवडीनिवडी महत्त्वाच्या? व्यक्तिगततेचे एका विशिष्ट पातळीवर होणारे निराकरण हे चांगल्या साहित्याचे एक लक्षण मानले जाते. व्यक्तिगतता ही सर्वच पातळ्यांवर टिकवणे, दाखवणे चांगल्या समीक्षेचे एक लक्षण असते काय? सरदेशमुखांच्या समीक्षेने सूचित केलेला हा प्रश्न प्रत्येक समीक्षकाने आपापल्या परीने सोडविला पाहिजे. सरदेशमुखांनी तो त्यांच्या परीने फार प्रभावीपणे सोडवलेला आहे, तो प्रत्यक्ष स्वतंत्र वृत्तीच्या समीक्षेतून आणि या प्रश्नाची प्रश्नात्मकता नाकारून! स्वसंवेद्य आत्मरूपाचे प्रकटन हे साहित्याचे स्व-स्वरूप आहे, असा सरदेशमुखांचा सिद्धांतच आहे. साहित्य व समीक्षा यांच्यातील पौर्वापर्य स्वीकारूनही त्यांच्यातील मूलभूत एकात्मताही ते स्वीकारतात. या दृष्टीने पाहिले, तर समीक्षा हीदेखील स्वसंवेद्य आत्मरूपाचेच प्रकटन ठरते. त्यामुळे समीक्षकाने व्यक्तिगततेच्या पैल जाणे, समीक्षा ही व्यक्तिसंदर्भातीत होणे यांसारखे रूढ संकेत सरदेशमुख झुगारून देतात.

### गडकऱ्यांची संसारनाटके :

'गडकऱ्यांची संसारनाटके' (१९७०) हे सरदेशमुखांचे क्रमाने दुसरे असे महत्त्वाचे समीक्षालेखन होय. काव्याच्या खालोखाल नाटक, नाटककार, नाट्यसमीक्षा यांना त्यांच्या आवडीनिवडीत मोठेच स्थान आहे. व्हिक्तर ह्यूगो, वर्ट्राल्ट ब्रेख्त, युजीन आयनेस्को यांसारखे पश्चिमी नाटककार त्यांच्या सर्जनशील आस्वादक समीक्षेचे विषय झालेले आहेत. (शारदीय चंद्रकळा, १९९२) 'टाहो' व 'थैमान' ही त्यांची दोन नाटकेही प्रकाशित झालेली आहेत. गडकरी आपल्या नाटकांना संसारनाटके म्हणत, ही गोष्ट सरदेशमुखांना फार अर्थपूर्ण वाटते. ''गडकऱ्यांनी मराठी नाटकाला भावात्म, मनोगम्य आणि एका अर्थाने मुक्तसंचारी केले व लिरिकल ड्रामाची नौबत प्रथमच मराठी रंगभूमीवर गाजवली. मी म्हणेन, मराठी नाट्येतिहासातील ही स्वातंत्र्याची चळवळ होती. एका दृष्टीने व्यक्तिगत, असनदशीर, क्रांतिकारी. 'प्रेमसंन्यास' (१९१२) 'पुण्यप्रभाव' (१९१६) आणि 'एकच प्याला' (१९१७) या तीनच पावलांत त्यांनी तत्कालीन नाटकाचे जग जिंकले.'' सरदेशमुखांनी आपल्या गडकऱ्यांची संसारनाटके या पुस्तकाच्या प्रास्ताविकात या प्रकारे प्रतिपादन केले आहे. त्यावरून सरदेशमुखांच्या गडकरी-समीक्षेचे वेगळेपण सहजपणे लक्षात येते.

या पुस्तकात विस्तृत असे प्रास्ताविक टिपण असून त्यात नव्या गडकरी समीक्षेची गरज, गडकऱ्यांच्या एकूणच नाटकांची वैशिष्ट्ये, त्यांचा सांस्कृतिक वारसा, त्यांची भावात्मता किंवा काव्यात्मता, त्यांच्या नाटकातील आत्मबिंबित वस्तुरूप, त्यांचा रोमँटिसिझम, विनोद,

गडकऱ्यांच्या नायक-नायिकांचा संसारपट, त्यांचा वाग्यज्ञ, राजसंन्यास नाटक, गडकऱ्यांची नवता हे विषय मोठ्या प्रभावीपणे स्पष्ट केलेले आहेत. पुढील चार प्रकरणातून प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, भावबंधन व एकच प्याला या चार नाटकांचे विश्लेषण दिलेले आहे. पाचव्या प्रकरणात एकूण मांडणीचे समालोचन केलेले आहे.

तत्त्वगर्भता, जीवनविषयक तीव्र वेदना व शोकात्म संवेदन, स्वच्छंदतावादी, आदर्शवादी व काहीसे अस्तित्ववादीही असे संमिश्र संवेदन, व्यक्तिमूल अस्तित्व संवेदना, स्वसंवेद्य आत्मरूपाचे प्रकटन, भावनांच्या रसरंगात मिसळलेले बुद्धीचे तेज यांसारख्या गुणांनी गडकऱ्यांची नाट्यनिर्मिती अनन्यसाधारण ठरते. त्यांची संसारनाटके म्हणजे अशा गुणधर्मांचे पाझरते चंद्रकांत आहेत, असा आपल्या समीक्षेचा समारोप सरदेशमुख करतात.

मराठीतील गडकरी-समीक्षेत सरदेशमुखांची ही मांडणी वैशिष्ट्यपूर्ण ठरते, ती तिच्यातील समग्रतेमुळे व त्या समग्रतेला गवसणी घालण्यासाठी जी तत्त्वचौकट स्वीकारली आहे तिच्यामुळे ! नाट्यसमीक्षेच्या रूढ पद्धतीबाहेरची ही समीक्षा आहे, हेही स्पष्टच आहे.

सरदेशमुखांच्या या गडकरीसमीक्षेत रंगभूमी व नाट्यप्रयोग या अंगांचा परामर्श घेतलेला नाही. हे काम रंगभूमीच्या समीक्षकाचे आहे, असे ते मानतात. संहितावादी नाट्यसमीक्षा असे सरदेशमुखांच्या या गडकरी-समीक्षेचे वर्णन करता येईल. दुसरे म्हणजे काव्यात्म जीवनदृष्टीचे अप्रूप. श्रेष्ठ नाटककार चांगले कवित्वही लाभलेला असतो, हे खरेच आहे. गडकऱ्यांची कविता तिच्यातील तीव्रोत्कट दाहकतेने सरदेशमुखांना विशेष प्रिय झालेली. गडकऱ्यांच्या नाटकातही तीव्रोत्कट काव्यात्मता पुरेपूर दाटलेली. तथापि नाटक म्हणजे केवळ काव्यात्मता नव्हे, हे उघडच आहे. श्रेष्ठ नाट्यकृतींमध्ये जीवनातील संघर्षांचे तलस्पर्शी दर्शन घडते. तलस्र्शी जीवनसंघर्ष प्रत्यक्ष जगण्याच्या प्रांगणात जाऊन शोधायचे व वेचायचे असतात. गडकऱ्यांच्या संसारनाटकातील जीवनसंघर्ष या प्रकारचे आहेत काय? त्यांची वर्गीय कक्षा किती व्यापक आहे? विदारक वास्तवाचा परीघ किती विस्तृत व खोल आहे? तत्त्वगर्भ वा काव्यात्म संघर्षाची विचारसंगत, तर्कसंगत टिपणे व नमुने काढून खरोखरच श्रेष्ठ नाट्यरचना त्या आधारे करता येते काय? काव्यात्म वृत्तीने जिण्याच्या हृदयालाच स्पर्श करता येतो हे खरेच; पण नाटकाला नाटकपणा व तोही श्रेष्ठ दर्जाचा नाटकपणा देण्यात वैचारिक सूत्रांवर बेतलेली हृदयस्पर्शी काव्यात्मता कितपत यशस्वी ठरते? गडकऱ्यांची संसारनाटके तत्त्वगर्भ जीवनसंघर्षाच्या कुरुक्षेत्राचे प्रस्थान ठेवतात आणि काव्यात्म कल्पिताच्या काशीला येऊन पोहोचतात, अशा अर्थाचा एक अभिप्राय खांडेकरांनी नमूद केला आहे. सरदेशमुखांना अर्थातच तो मान्य नाही.

सरदेशमुखांची प्रभावी गडकरी-समीक्षा वाचताना यांसारखे प्रश्न जाणवतात. पण हेही त्यांच्या समीक्षेचेच श्रेय मानले पाहिजे. ही गडकरी-समीक्षा वाचताना अनेक मर्मदृष्टी आपणास प्राप्त होतात. नाटक, काव्यात्मता, जीवनातील शोकात्मता, मानवी अस्तित्वाची पराधीनता व स्वतंत्रता यांसारख्या अनेक गोष्टींच्या अर्थपूर्णतेचे एका वेगळ्या परिप्रेक्ष्यात आपणास दर्शन घडते. काव्यात्म नाटकाचे एक वैशिष्ट्यपूर्ण प्रारूप या समीक्षेतून सिद्ध झालेले आहे.

भावविचारांची व जीवनदृष्टीची समृद्धी करणे हे जर समीक्षेचे कार्य असेल, तर ते कार्य सरदेशमुखांच्या या गडकरी-समीक्षेने निश्चित पार पाडले आहे, असे म्हणावे लागेल. काव्यात्म सर्जनशीलतेला साध्य असणारी मनुष्यजीवनाची खोल भावसत्ये शोधणे व समजून घेणे-देणे हाच सरदेशमुखांच्या समीक्षायात्रेचा ध्रुवतारा आहे. त्यांच्या समीक्षेचे हे बलस्थान तेव्हा दुर्बलस्थान होऊ पाहते, की जेव्हा त्या भावसत्यांना ते अंतिम आध्यात्मिक सत्यांचा पेहेराव चढवू लागतात, असे मला वाटते.

**शारदीय चंद्रकळा :**

'शारदीय चंद्रकळा' (१९९२) हे सरदेशमुखांचे अलीकडचे समीक्षालेखन. हे लेखन - कन्नड महाकवी द. रा. बेंद्रे यांच्यावरील १९७६ चा लेख वगळता-१९८५ ते १९९० या पाच- सहा वर्षांतील आहे. या पुस्तकातील एकूण नऊ लेखांपैकी पहिला लेख (स्व-रूप आणि साहित्य) हा तत्त्वचिंतनावर असून उर्वरित आठ लेखांचे विषय देशी-विदेशी प्रतिभावंतांवरील आहेत. त्यात जी. ए. कुलकर्णी, शरच्चंद्र मुक्तिबोध, कुसुमाग्रज हे मराठी साहित्यिक येतात आणि द. रा. बेंद्रे, व्हिक्तर ह्यूगो, हरमान हेसे, बर्टोल्ड ब्रेख्त व युजीन आयनेस्को हे मराठीतर साहित्यिक मोडतात.

साहित्याचे थोरपण आणि समीक्षेची सफलता यासंबंधीचे सुमारे चाळीसएक वर्षांत केलेले विचारचिंतन 'स्व-रूप आणि साहित्य' या लेखात दिल्याचे सरदेशमुखांनी आपल्या प्रास्ताविकात नमूद केले आहे. साहित्यक्षेत्रातील आठ दिग्गजांवरील लेखन हे त्यांच्या वाग्वैभवाचे समग्र रूप नसून ते गुणविवेचनपर असे त्या वाग्वैभवाचे आपले परिशीलन आहे, हेही त्यांनी स्पष्ट केले आहे.

साहित्यवेड्या अशा प्रगल्भ, मनस्वी व सर्जनशील महामनाने प्रतिभारूपांच्या शारदीय चांदण्याच्या बरसातीत रमून केलेले हे आत्मचिंतन व आत्मप्रकटन आहे. या प्रकारची समीक्षा एक प्रकारे असमीक्षीय ठरते; म्हणजे त्या समीक्षेची पुन्हा समीक्षा करणे आवश्यक ठरत नाही. एक प्रकारे स्वान्त:सुखाय व स्वान्त:प्रकटनार्थ निर्माण होणारी अशी समीक्षा वाचकानेही स्वान्त:सुखाय व स्वान्त:स्पष्टीकरणार्थ वाचावयाची असते. आदर व विस्मय वाटतो तो या गोष्टीचा की, स्वान्त: सुख आणि स्वान्त:प्रकटन यांचा केवढातरी प्रचंड परीघ सरदेशमुखांनी काबीज केला आहे त्याबद्दल! साहित्यनिर्मितीत आमरण धुंद झालेली प्रतिभाशाली माणसे आपणास ठाऊक असतात; पण साहित्यचिंतनात, साहित्यस्वादात कायमची मग्न राहिलेली सरदेशमुखांसारखी माणसे फार कमी आढळतात. साहित्यसंस्कृतीचे व्रतस्थ शिल्पकार असेच त्यांचे यथार्थपणे वर्णन करता येईल. व्रतस्थ समीक्षा व समीक्षक म्हणजे साहित्यसंस्कृतीच्या स्थितिगतीला चैतन्य पुरवणारी सत्त्वधारा होय. सरदेशमुखांच्या समीक्षेचे या प्रकारचे योगदान निर्विवादपणे मान्यच करावे लागेल आणि त्याचा वारसा चालविण्याची जबाबदारीही ओळखावी लागेल.

कथा आणि कथाकार हे सरदेशमुखी समीक्षेचे उपेक्षित विषयच म्हटले पाहिजेत. तथापि या पुस्तकात जी.ए. कुलकर्णींच्या दृष्टांतकथांवर एक लहानसा लेख मात्र आहे. यातही

सरदेशमुखांच्या आवडी-निवडीचा रोख सूचित होतोच. कथा हा वाङ्मयप्रकार दिसतो तेवढा सोपा नाही, हे त्यांचे मत. मासिकांदिकांतील कथांचा सवंग माल त्यांना मुळीच पसंत नाही. म्हणूनच बहुधा त्यांनी स्वत:ही कथालेखन करण्याची ऊर्मी वेळीच दाबून टाकली. जी. एं.च्या संसारकथांकडे न वळता सरदेशमुख त्यांच्या दृष्टांतकथांकडे वळतात; कारण दृष्टांतकथा ही मौलिक जीवनसत्यांची काव्यात्म प्रतिमा असते. कविमनाच्या आत्मरूपाचे ते संवेदन व प्रकटन असते. आणि अशा प्रतिमा-प्रकटनांवर तर सरदेशमुखांचे भारी प्रेम! खरे तर, सरदेशमुखांनी आपल्या समीक्षेचे हुकमी प्रभुत्व असलेला दृष्टांतकथांसारखा विषय न निवडता जी. एं.च्या संसारकथा हा विषय निवडला असता, तर किती बरे झाले असते, असे मनात येऊन जाते. गडकऱ्यांच्या संसारनाटकांनी त्यांना समीक्षाव्यापाराच्या जितक्या खोल पाण्यात उभे करून जीवनसाहित्याचे सखोल स्वरूप शोधावयास लावले; त्यापेक्षाही अधिक खोल अशा डोहकाळिम्यात जी. एं.च्या संसारकथांनी त्यांना डांबून ठेवले असते. आणि या डांबण्याचा आनंद त्यांना मोठाही वाटला असता...! गडकऱ्यांच्या संसारनाटकांपेक्षा जी. एं.च्या संसारकथा हे सरदेशमुखांच्या समीक्षादृष्टीला अधिक मोठे व महत्त्वाचे पण प्रियतम असे आव्हान ठरले असते !

जी.एं.च्या दृष्टांतकथांवरील लेखात सरदेशमुखांनी पास्तरनाकच्या लघुलिपीच्या तत्त्वाचा निर्देश केलेला आहे : 'व्यक्तिगत जीवनमान भंगुर आहे आणि एकंदर जीवन अमर्याद व शाश्वत आहे. त्यांच्या संबंधाविषयी, गुंतागुंतीविषयी बोलायचे, तर अलंकार, प्रतिमा, प्रतीके यांचा आश्रय करणे कवीला भाग पडते. कारण त्याला आपल्या दर्शनाची (क्षणार्धात मावळून जाणारी) रूपे कमीत कमी वेळेत, कमीत कमी शब्दांत मांडून दाखवायची असतात. (आउटसाइझ पर्सनॅलिटीज यूज मेटॅफर ॲज ए शॉर्टहँड ऑफ द स्पिरिट).

सरदेशमुखांच्या अफलातून अन्वयशोधक व्यासंगाचा एक अपूर्व नमुना या लेखात आहे (शारदीय चंद्रकळा - १९९२ पृष्ठ ४५). १८८८ साली इंग्लंडच्या ड्यूक ऑफ कॅनॉट यांनी पुण्यास भेट दिली. त्यावेळच्या त्यांच्या सन्मानार्थ योजिलेल्या मेजवानीप्रसंगी म. फुले उपस्थित राहिले. पागोटे, पंचा, घोंगडे व काठी या परिवेषात. देशातील जनतेचे खरेखुरे प्रतिनिधी म्हणून. या प्रसंगाचे वर्णन करून पुढे सरदेशमुख लिहितात : "जी. एं.च्या कथांचे रूप व त्यांचा आशय आणि वर उल्लेखिलेले ज्योतिरावांचे खेडवळ रूप, मोक्याच्या प्रसंगी अत्यंत प्रगल्भ बुद्धीने त्यांनी प्रकट केलेली अंत:करणाची वेदना व तिच्यामागील वास्तव यांत मोठे प्रकृतिसाम्य आहे, असे मला वाटते. कोणीतरी म्हटले आहे, की आपल्या एरवीच्या जीवनातल्या घटनादेखील कालांतराने, प्रतीकासारख्या होतात आणि खोल अर्थगर्भ बनतात."

- हा केवढा प्रचंड अर्थपूर्ण अन्वय ! सरदेशमुखांच्या कामयाब व्यासंगाला, मर्मदृष्टीला आणि अन्वयसाधक बुद्धीला इथे पुरेपूर दाद तरी कुठल्या शब्दांतून देणार...?

या पुस्तकातील 'स्व-रूप आणि साहित्य' हा लेख म्हणजे सरदेशमुखांचे साहित्य-समीक्षाविषयक एक अध्यात्मशास्त्रच म्हणता येईल. यात पुन्हा अवतरणांची दाटी झालेली आहे. अध्यात्मात अंतरंगच अधिकारी! तेव्हा या सरदेशमुखी अध्यात्मशास्त्राचा प्रभाव अधिकारी

अंतरंग असलेल्या व्यक्तींपुरताच सीमित राहणे स्वाभाविक ठरते. पण हा लेख वाचनीय व मननीय आहे. साहित्याची समीक्षा व सैद्धांतिक समीक्षा यांच्या शर्यतीत साहित्याची समीक्षा नेहमीच अग्रेसर ठरून यशस्वी होते. साहित्याची मूळ प्रकृतीच बहुधा सिद्धांतनास अव्हेरणारी असते. किंवा विशिष्ट साहित्यसापेक्ष सिद्धांतनच त्या प्रकृतीला मानवणारे ठरते. सरदेशमुखांची साहित्यसमीक्षा ही अर्थातच त्यांच्या तात्त्विक स्वरूपाच्या समीक्षेपेक्षा अधिक मोठी आहे. आणि त्या साहित्यसमीक्षेत तत्त्वमंथनही भरपूर आहे.

'शारदीय चंद्रकळा'मधील कुसुमाग्रजांवरील विश्लेषण वेगाने बदलत जाणाऱ्या व अनपेक्षित वळणांनी कधी संभ्रमकारक व कधी अनाकलनीय ठरणाऱ्या कालप्रवाहातील एका जातिवंत कविमनाचे आतले-बाहेरचे प्रश्न नेमस्तपणाने उलगडून दाखविणारे आहे. कुसुमाग्रजांच्या कवितेच्या व काव्यप्रवृत्तीच्या मर्यादाही त्यात स्पष्ट केल्या आहेत. मुक्तिबोधांसारख्या प्रखर आशावादी कवियोग्याला अखेर निराशा का ग्रासते, याचेही सविस्तर विवेचन सरदेशमुख देतात.

'शारदीय चंद्रकळे'त देशोदेशीचे चांदणे पाझरत आहे. व्हिक्टर ह्यूगो, आयनेस्को, ब्रेख्त, हरमान हेसे यांची परिशीलने सरदेशमुख मोठ्या आत्मीयतेने सादर करतात. या प्रकारचे चिंतन-लेखन नेमके कोणासाठी असते? सरदेशमुख यावर उत्तर देतील ते असे की, एका कृतज्ञाने आपल्या उपकारकर्त्याला अभिवादन करण्यासाठी ते लेखन केले जाते. म्हणजे ते खरे तर स्वत:साठीच करण्यात येते. दुसरे उत्तर त्यांच्या आवडत्या साकल्याच्या प्रदेशाच्या सिद्धांतातून मिळू शकते. ते म्हणजे आपल्या साहित्यसंस्कृतीसाठी हे लेखन करण्यात येते. साहित्यसंस्कृती ही अव्यक्त संकल्पना आहे. ती व्यक्त होते साहित्यसंस्कृतीचे कमीअधिक भान असणाऱ्या माणसांतून. अशा माणसांसाठी हे लेखन असते. विश्ववाङ्मयाची संकल्पना आणि साकल्याच्या प्रदेशाची संकल्पना यात साम्य आहे, असे म्हणता येईल. मात्र विश्ववाङ्मय काय किंवा साकल्याचा प्रदेश काय, त्यास आत्मसात करण्याची, अप्रोप्रिएट करण्याची, सरदेशमुखांची रीत ही खास त्यांची अशी रीत आहे. या सरदेशमुखी रीतीला अर्थातच इतरही रीतींचे पर्याय असू शकतात, हे उघडच आहे. असे पर्याय शोधण्याची क्रियाशीलता मराठीत निर्माण होण्यास चालना देण्याचे कार्य सरदेशमुखांच्या समीक्षेने नकळतपणे पार पाडले आहे. अर्थात् या प्रकारच्यां विदेशी प्रतिभारूपांच्या परिशीलनाची आधुनिक मराठीत एक लहानशी परंपराही आहेच. त्या परंपरेला उजाळा देण्याचे कार्यही सरदेशमुखांनी केले आहे.

**समारोपाची निरीक्षणे :**

सरदेशमुखांच्या एकूण समीक्षालेखनाचे सर्वांगीण व समग्र म्हणता येईल, असे हे समालोचन अर्थातच नाही. ते समीक्षालेखन पुन्हा एकदा एकत्रितपणे परिचित करून देणे, एवढाच मुख्य हेतू या लेखामागे आहे. पण पूर्णपणे वस्तुनिष्ठ स्वरूपाचा हा परिचय नाहीच; परिचय करून देण्यांच्या प्रक्रियेत माझ्या काही प्रतिक्रियाही उमटलेल्या आहेत. त्या प्रतिक्रिया तारतम्याने लक्षात घ्याव्यात व मुख्यत: सरदेशमुखांच्या समीक्षेकडे पहावे, वळावे व समृद्ध व्हावे, हीच माझी वाचकांकडून अपेक्षा आहे.

सरदेशमुखांच्या समीक्षेत एक चांगल्या अर्थाने जाणवणारा आक्रमक मनस्वीपणा आहे. हा मनस्वीपणा चिंतनमननातून निःसंदिग्धपणे निष्पन्न झालेल्या त्यांच्या साहित्य व समीक्षाविषयक भूमिकेतून आलेला आहे. ही भूमिका 'स्वसंवेद्य आत्मरूप' या संकल्पनेत सारभूतपणे समाविष्ट होते. जीवन आणि साहित्य यांच्या साकल्याच्या प्रदेशाची संकल्पना ही स्वसंवेद्य आत्मरूपाच्या प्रकटनाला, विकसनविस्ताराला परिपोषक ठरते; नव्हे वैश्विक संसाराची सनदच जणू देते. म्हणून व्यक्ती व व्यक्तिमूल्य यांना सरदेशमुखांच्या समीक्षेत केंद्रस्थान लाभले, तरी ते सविकल्प केंद्रस्थान आहे. कारण साकल्याच्या प्रदेशाचे संवेदन त्या व्यक्तिमूल्यात गृहीत धरलेले आहे; किंबहुना ती त्याची अटच आहे. म्हणून सरदेशमुखांची समीक्षा स्वच्छंदतावादी, व्यक्तिवादी, वास्तववादी, अध्यात्मवादी यांसारख्या लेबलांमध्ये अडकविणे योग्य ठरेलसे वाटत नाही. प्राधान्याने ती काही स्वच्छंदतावादी कल्पनांच्या प्रभावाखालील आहे, असे म्हणता येईल. समीक्षकाचे भान त्यांची समीक्षा फार फार करून देत राहते, समीक्षकाला विसरण्याची संधी ही समीक्षा सहसा देत नाही, हा वाचकाचा अनुभव जमेस धरला, तर या अर्थाने ही समीक्षा स्वच्छंदतावादी प्रभावाखालील आहे, असे म्हणता येईल.

आस्वादक समीक्षेला आरंभ असला, तरी अंत नसतो; ती भरकटत जाते व भरकटत नेते; आत्मप्रत्ययाच्या पांगत जाणाऱ्या तरंगात ती रमत व वाहत जाते; तर्कसंगत समीक्षीय विधानांची वानवा तिच्यात जाणवते आणि एक प्रकारचे स्वैर आत्मप्रदर्शन तिच्यातून कुरवाळण्यात येते. यांसारख्या आक्षेपांना सरदेशमुखांची आस्वादक समीक्षा आव्हान देणारी आहे. सरदेशमुखांनी या आव्हानाला पुरेशा ताकदीने पेलून वरेचसे हटविलेही आहे, असेही काही जणांना वाटते. कारण साहित्य, समीक्षा, मनुष्यजीवन यांच्या परस्परसंबंधातील अनेक गुंतागुंतीच्या मर्मस्थळांवर त्यांची समीक्षा सतत प्रकाश टाकीत जाते. साहित्य, समीक्षा व मानवी जीवन परस्परांच्या आरशात व परिप्रेक्ष्यात पाहण्याची व दाखविण्याची क्षमता त्यांच्या समीक्षेत आहे, हे नाकबूल करता येणार नाही.

शोकात्म वा दुःखात्म संवेदन हे सरदेशमुखांच्या समीक्षादृष्टीचे एक वैशिष्ट्य आहे. या संवेदनातच मानवी जीवनाच्या मूलभूत सत्यतांची रूपे दडलेली असतात. साहित्य व समीक्षा यांचे अंतिम विश्लेषणातील समर्थन त्या सत्यतांच्या प्रकटनाचे त्यांचे जे बळ असते, त्यातूनच होऊ शकते. गंभीर व मनस्वी वृत्तीची व्यासंगी समीक्षा व समीक्षक एका परीने अंधाराचेच यात्रिक व प्रकाशक असतात.

पश्चिमी साहित्यविचारांची समृद्धी, संपन्नता व प्रभावशालिता सरदेशमुखांच्या समीक्षेने अधोरेखित केलेली आहे. प्रश्न पश्चिमी असा हा प्रभाव कमी करण्याचा नसून तो प्रभाव सर्वसामान्य मराठी साहित्यप्रेमिकांच्या व जिज्ञासूंच्या आवाक्यात आणण्याचा आहे. म्हणून मराठी-इंग्रजी अशा द्वैभाषिक वाङ्मयीन व्यासंगाला व अभ्यासाला कशी चालना देता येईल, हा मोठाच प्रश्न आहे. पश्चिमी व्यासंग व प्रभाव हे अगदीच अल्प अल्पसंख्यांकापुरते आज तरी मर्यादित आहेत. त्यामुळे सरदेशमुखांसारख्यांचे काही समीक्षालेखन वहुसंख्याकांना उपरे, उच्चभ्रूपणाचे, निरुपयोगी आहेसे वाटू लागते व यात त्यांचा दोष नाही. पश्चिमी प्रभावाची

खिडकी उघडीच ठेवली पाहिजे, पण तिच्यातून येणाऱ्या प्रकाशधारांतून आपले साहित्य व साहित्यिक हे अधिक प्रकाशित करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. एवढा बोध सरदेशमुखांची समीक्षा नक्कीच करते.

सरदेशमुखांची शैली काव्यात्म, अवतरणप्रिय आणि विचारव्यूह (डिस्कोर्स) व त्याच्या मांडणीच्या रूढ पद्धती यांना सामान्यत: नाकारणारी अशी आहे. एक प्रकारे विमुक्त शैलीतील त्यांचे समीक्षालेखन आहे. सरदेशमुखांच्या काव्यात्म शैलीचे व प्रतिमाप्रीतीचे एक अर्थपूर्ण उदाहरण म्हणजे हेरमान हेसेच्या मूळ 'सिद्धार्थ' नावाच्या कादंबरीचे भाषांतर त्यांनी 'नदीपार' ह्या काहीशा सांकेतिक प्रतिमेच्या शीर्षकाने प्रसिद्ध केले. काव्यात्म प्रतिमांची एक प्रकारची असोशी anxiety सरदेशमुखांत आहे, हे जाणवते. आशय व अभिव्यक्ती यांतील तथोक्त एकात्मता हीदेखील सरदेशमुख सांकेतिक बिनशर्तपणे मान्य करीत नाहीत. त्यांच्या अशा असांकेतिक शैलीच्या अवगुंठनाखालील आशय वेचत जाणे क्रमप्राप्त ठरते. मात्र, सरदेशमुखांचे शैलीविशेष हेही मोहक वाटतात. कितीतरी नवे नवे शब्द, समास, वाक्प्रचार, प्रतिमा, प्रतीके त्यांनी निर्माण केलेली आहेत. अंधारयात्रेपासून शारदीय चंद्रकळेपर्यंत त्यांच्या प्रत्ययकारी भाषेची व शैलीची सुंदर, अर्थपूर्ण व अभिनव रूपे प्रकट झालेली आहेत. एक प्रकारचा थेटपणा, एकप्रकारची भेदकता, एक प्रकारचा अभिजातपणा आणि एक प्रकारचा स्वच्छंदीपणा त्यांच्या शब्दकळेत व शैलीत जाणवतो. त्यांची भाषाशैली कशीही मानली, तरी एक शैलीदार समीक्षक म्हणूनच त्यांचा ठसा मनावर उमटतो. इंग्रजी शब्द, वाक्ये, अवतरणे यांचे मराठीकरण सरदेशमुख आवर्जून देतात. ही त्यांची रीती नक्कीच अनुकरणीय आहे.

शेवटी एकच गोष्ट पुन्हा नमूद करावीशी वाटते. ती अशी की, स्वातंत्र्योत्तर काळातील एक व्रतस्थ, व्यासंगी व स्वतंत्र दृष्टीचे सरदेशमुख हे एक थोर समीक्षक आहेत. त्यांची समीक्षा वाचणे हेदेखील शारदीय चंद्रकळेच्या बरसातीत रंगणे व रमणे ठरते. आणि मग आपण खूप खूप श्रीमंत झाल्याचाही प्रत्यय येतो. अशा समीक्षेची व अशा श्रीमंतीची अप्रूपता वाढत जावी हीच अपेक्षा! □

प्रा. रा. ग. जाधव
११८०, सदाशिव पेठ, अनपट बिल्डिंग, पुणे ४११ ०३०.

---

## स्वागत

- □ **ओळख :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- □ **कष्टाला पंख फुटले :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- □ **माणसं विकली जातात :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- □ **देवाचा पाणमळा ;** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- □ **खरा सोबती :** दत्ता ससे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- □ **तांडेल :** रावजी राठोड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २०८
- □ **नवचैतन्य (मासिक)** : शर्मिला गोसावी, नगर, पृष्ठे ६०
- □ **पाझर :** उ. सा. टिळक, परिमल प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९६

---



अनुक्रमणिका

# कुसुमाग्रजांच्या गावी

डॉ. मंदा खांडगे

'युगामागुनी चालली रे युगे ही
करावी किती भास्करा वंचना '

असे पृथ्वीचे प्रेमगीत आळवणारे आणि विशाखा नक्षत्राला आपल्या काव्याचे शीर्षकस्थानी आणून ठेवणारे कविश्रेष्ठ कुसुमाग्रज. दोन वर्षांपूर्वी त्यांच्या ८५ व्या वाढदिवशी स्वित्स्झलँडमधील इंटर्नॅशनल स्टार रजिस्ट्री या ख्यातनाम आंतरराष्ट्रीय संस्थेने या महाकवीचे नाव आकाशातील एका नक्षत्राला देऊन अगदी आगळी भेट त्यांना देऊन यच्चयावत रसिकांच्या हृदयावर अढळ स्थान मिळविणाऱ्या तात्यासाहेबांचा गौरव केला होता.

निसर्गाची उत्कटतेने पूजा बांधणाऱ्या, प्रकाशाचे वेड असलेल्या या कवीने 'कोलंबसाचे गर्वगीतात,

'नक्षत्रापरी असीम नीलामधे संचारावे
दिशांचे आम्हाला धाम !'

असे म्हटले होते. एका अर्थी त्यांची इच्छाच जणू पूर्ण झाली. नेहमी माणसांमध्ये वावरणारा हा कवी,

'तुझ्या यशाचा हा पुनवचांद
अमृत देई आर्त जीवाला'

असे म्हणत प्रत्येकाच्या सुख-दु:खात सहभागी होत होता. ज्ञानपीठ विजेत्या कविराजांनी पाऊलचिन्हे या आपल्या कवितेत म्हटलंय,

'स्मित करून म्हणाल्या मला चांदण्या काही
तो मुक्त प्रवासी फिरत सदोदित राही'

स्टार रजिस्ट्रीने तात्यासाहेबांना 'अवकाशातील तारकांवरही अधिराज्य करा' अशा शुभेच्छा पाठविल्या होत्या.

कुसुमाग्रज प्रतिष्ठानच्या तात्यासाहेबांच्या वास्तूत पाऊल ठेवलं आणि त्या सुन्या सुन्या वास्तूला पाहून जाणवलं, खरंच साहित्य रसिकांच्या मनावर अधिराज्य गाजवणारा हा कवी आता खरोखरच भूतल सोडून अवकाशात अधिराज्य गाजवायला निघून गेलाय.

१७ सप्टेंबर, १९८८. तात्यासाहेबांना ज्ञानपीठ पुरस्कार जाहीर झाला. ११ मार्च, ८९ रोजी मुंबईमध्ये तो प्रदान झाला. या निमित्ताने कुसुमाग्रज प्रतिष्ठानची स्थापना झाली. प्रतिष्ठानने शासनाकडून तरण तलावामागचा हा महापालिका प्रशासकांचा बंगला विकत घेतला. प्रतिष्ठानसमोर असलेला घराचा प्रश्न सुटला. तात्यासाहेब त्यावेळी म्हणाले होते, 'हयात

असेपर्यंत या घरात राहीन नंतर मात्र या घराची मालकी प्रतिष्ठानने स्वीकारावी आणि या ठिकाणी सांस्कृतिक केंद्र सुरू करावे. तात्यासाहेब या वास्तूत रहायला आले. डाव्या भागात प्रतिष्ठानचं कार्यालय सुरू झाले. उजव्या भागात एक झोपायची आणि बैठकीची मोठी खोली, स्वयंपाकघर आणि एक खोली एवढ्या जागेत तात्यासाहेब राहू लागले. तरण तलावामागचा टिळक वाडीतील गोखले मार्गावरचा हा शांत परिसर. तात्यासाहेब इथे वास्तव्याला आले आणि हा परिसर फुलू लागला. तात्यासाहेबांच्या भेटीला अनेक चाहते येत. नवोदित लेखक, कवी येत. कोणी पुस्तकाला प्रस्तावना घेण्यासाठी येई. ग्रामस्थ आपल्या समस्या घेऊन येत. आप्तस्वकीय भेटीला येत. या साऱ्यांचं तात्यासाहेब हसून स्वागत करत. दुपारच्या वेळी लहान मुलं बालवाचनालयात पुस्तकं वाचायला येत. त्यांच्यामध्ये तात्यासाहेब फिरून येत. सरस्वतीच्या पूजकाची ही वास्तू अशी सजग असायची. फाटकातून आत शिरल्यावर उजव्या हाताला पांढरा जाळीचा दरवाजा, आत व्हरांडा, त्याला बाहेरून पांढरे ग्रील. दारापुढे छोटीशी सुबक बाग. दोन नारळाची झाडे. तळपत्या उन्हातही डोळ्यांना हिरवाई देणारी लॉन. तात्यासाहेबांच्या भेटीला जाताना या पांढऱ्या जाळीच्या दरवाजातून आत जायचं पण आता तो बंद होता. डाव्या हाताला प्रतिष्ठानचं कार्यालय उघडं होतं. डाव्या भिंतीवर एक कापडी फलक टांगलेला- 'ज्ञानेश्वरांच्यासारखे संत महात्मे ईश्वराकडे नेहेमी स्वप्नेच मागत असतात. सर्व मागणे कधीच सफल होत नाही. पण पूर्णत: विफलही होत नाही'- वि. वा. शिरवाडकर. या वचनाची मनात उजळणी करतच प्रतिष्ठानच्या कार्यालयात शिरले. तात्यासाहेब तुम्ही म्हटलंय ते खरंच आहे. आपण जे योजत असतो, मनातून मागत असतो, ते सगळंच पूर्ण होत नाही. तसं असतं तर खंत, खेद, दुःख, निराशा हे शब्दच उणे झाले असते. आपण कितीही कर्मवादी असलो तरी हेही मानावंच लागतं की नियतीच्या हातचं आपण बाहुलं असतो. ८ मार्चला तात्यासाहेबांना मी जे पत्र पाठवलं होतं, त्याचं उत्तर आलं. ते त्यांनी स्वत: लिहिलं नव्हतं. प्रा. वसंत पाटील यांच्याकडून लिहून घेतलं होतं. त्यांना मी दरवर्षी वाढदिवसाच्या शुभेच्छा पाठवते. तात्यांचं वि. वा. शिरवाडकर असं लपटेदार सहीतलं पत्रोत्तरही येत असे. या वेळी तात्यासाहेबांची तब्येत बरी नसल्याने त्यांचं पत्र येणार नाही हे गृहीत धरलेलं होतं. पण पत्र आलं आणि मी आनंदून गेले. पत्रातून मी तात्यासाहेबांना कळवलं होतं, नुकतीच मी बेळगावी जाऊन आले. इंदिरा अक्काचं गाव केलं. 'कवीच्या गावा जावे' हा प्रकल्प पुरा करत आणलाय. आता फक्त आपलं गाव करायचंय. प्रकल्पाची सांगता आपल्या गावाने करणार आहे. पत्रात प्रा. वसंत पाटील यांनी असं कळवलं होतं, 'तुमचे सदिच्छापत्र मा. कुसुमाग्रजांना मिळाले. आजारपणातही त्यांना आनंद वाटला. तुमच्या उपक्रमाचे त्यांनी कौतुक केले आहे. कविवर्यांचे आशीर्वाद.' — इति तदाज्ञया. पत्र वाचून मला खूप बरं वाटलं.

पाच एक वर्षांपूर्वीची ती संध्याकाळ आठवली. मी नाशिकला पोहोचले होते. तात्यासाहेब त्यावेळी नुकतेच मोठ्या आजारातून उठले होते. त्यामुळे भेट होईल का? झाली तर बोलतील का? असे प्रश्न मनात होते. फोन केला तर तात्यासाहेबच फोनवर बोलले. लागलीच या म्हणाले. बरोबर मी त्यांना भेट द्यायला पुस्तक घेतलं होतं. नाशिकमधली तात्यासाहेबांची

लागोपाठ या घरातली ही दुसरी भेट होती. एरवी पुण्यात कुसुमताईंच्या घरी तात्यासाहेब उतरत त्यावेळी भेट होई. कुसुमताईंचं घर आमच्या घराच्या मागेच असल्याने तात्यासाहेब आल्याचं कळायचं. त्यावेळी मी सहकारनगरमध्ये रहात होते. आता या मधल्या आजारांमुळे तात्यासाहेबांचं पुण्यात येणं कमी झालं होतं. मीही सहकारनगर सोडून औंधमध्ये वास्तव्याला आले होते. एरवी कुसुमताईंकडून तात्यासाहेबांची ख्याली-खुशाली समजत असे. नाशिकला यावेळी तात्यासाहेबांना भेटायला जाताना कुसुमताईंना विचारून गेले होते. त्या म्हणाल्या होत्या, 'जा नं. तात्यासाहेब आता बरे आहेत. त्यांना आनंद होईल.' तात्यासाहेबांच्या घराच्या दर्शनी भागात बऱ्याचशा चपला दिसत होत्या. म्हणजे आतमध्ये बरीचशी मंडळी बसलेली दिसतात असा अंदाज मी बांधला. आता डोकावले. कोणी कोणी मंडळी तात्यांना भेटायला आलेली होती. तात्यासाहेबांनी आत यायची खूण केली. 'या या. कधी आलात?' चौकशी केली. बसायला सांगितलं. तात्यासाहेब प्रसन्नपणे सगळ्यांशी शांत आवाजात बोलत होते. मी श्रोता होऊन ऐकत होते. तात्यासाहेबांना कुसुमताईंकडे मी पहिल्यांदा भेटले होते, त्यावेळी वाटलं होतं, की एवढ्या मोठ्या कविवर्यांशी आपण काय बोलणार? कसे असतील स्वभावानी. पण पहिल्यांदाच भेटत असताना लक्षात राहिलं ते त्याचं उंच भव्य कपाळ. डोळ्यांमधला अति स्निग्ध भाव. ओठांच्या कोपऱ्यातलं मंद मधुर स्मित. आवाजातला भारदस्तपणा आणि स्निग्धता. माझ्या वडिलांचे ते कविमित्र. त्यामुळे तो एक गप्पांचा धागा होता. मी ज्या

संस्थेचं काम करते त्याची माहिती मी त्यांना सांगितली तेव्हा त्यांनी समाधान व्यक्त केलं होतं. त्यावेळी माझी जी लेखनाची धडपड चालू होती, त्याची विचारपूस केली होती. अगदी आपलेपणानी. तात्यासाहेबांची ती भेट, त्यांच्या चेहऱ्यावरचा तो वत्सलभाव अजूनही माझ्या दृष्टीसमोर जसाच्या तसा येतो. मग तात्यासाहेबांची जेव्हा भेट होई, पुण्यात, नाशिकात मला कधीच परकेपणा वाटला नाही. त्यांच्या अंतर्यामी असलेला मृदुभावच असा होता की त्यांना भेटलं की त्यांच्या अकृत्रिम स्नेहामध्ये आपलेपणा जाणवायचा. त्यामुळे आजारपणातून उठले होते तरी त्यांना एकदा पाहून यावं, भेटावं म्हणून आले होते. आलेली मंडळी उठली. तात्यासाहेब एकटे उरले. तात्यासाहेबांना पाहिलं आणि जाणवलं, तात्यासाहेब आजारातून उठल्याने खूप थकले आहेत. मी वाकून नमस्कार केला आणि 'वैभव पेशवेकालीन वाड्यांचे' हे माझं पुस्तक त्यांच्या हाती दिलं. पुस्तक पाहून त्यांनी समाधान व्यक्त केलं. नवीन काय लिहिताय याची चौकशी केली. त्यावेळी माझ्या मनात असलेला विषय मी तात्यासाहेबांना सांगितला. अर्वाचीन कवितेचे प्रणेते केशवसुतांपासून सुरुवात करून दहा ते बारा कवींच्या गावी जायचं. त्यांचं जन्मघर, त्यांचं गाव शोधायचं. त्या सभोवतालचा परिसर पहायचा आणि त्यावर लिहायचं. माझ्या मनात असलेल्या कवींची नावं त्यांना सांगितली. असं काम कोणी केलेलं नव्हतं. तात्यासाहेबांना हा प्रकल्प आवडला. मग ते त्यावर खूप वेळ बोलत राहिले. मी त्यासाठी काय काय करावं हे त्यांनी मला अतिशय चांगलं समजावून मार्गदर्शनच केलं. एक उत्तम वस्तुपाठच होता तो. जवळजवळ दोन अडीच तास कसे संपले ते कळलंही नाही. निघाले तेव्हा परत एकदा वाकून मी तात्यासाहेबांना नमस्कार केला. एका मोठ्या प्रकल्पाचा संकल्प या वास्तूत सोडला होता आणि तो पुरा करण्यासाठी आत्ता यावेळी इथे आले होते. पण माझे मार्गदर्शक मला परत कधीच भेटणार नव्हते. पाच वर्षांपूर्वीची तात्यासाहेबांची प्रत्यक्ष अशी ती शेवटची भेट ठरली. त्यानंतर मीही कवींची गावं करत राहिले. तात्यासाहेबांना कळवत राहिले आणि या महाकवीच्या गावाविषयी लिहिण्यासाठी येऊन पोहोचले होते. त्याला थोडा उशीर झाला. काळ कोणासाठीही न थांबणारा असतो. आठ मार्चला तात्यासाहेबांचं पत्र हातात होत आणि दहा मार्चला तात्यासाहेब इहलोक सोडून गेल्याची बातमी वाचून सुन्न व्हायला झालं. 'सर्व मागणं कधीच सफल होत नाही' तात्यासाहेबांनी हा प्रकल्प पूर्ण झालेला पहावा, वाचावा, त्याच्या पुस्तकासाठी चार ओळी लिहाव्यात अशी खूप इच्छा मनात होती. ती अपुरी राहिली. पण त्यांच्या वास्तूत सोडलेला हा प्रकल्पाचा संकल्प पूर्ण तर करायला हवा होता. बरोबर मैत्रिणी होत्या. आम्ही खरं तर मार्चच्या तिसऱ्या आठवड्यात नाशिकला जायचं ठरवलं होतं. पण तात्यासाहेब गेले आणि ते जाणं पुढे ढकलून एप्रिलच्या पहिल्या आठवड्यात जायचं नक्की केलं. देवळात देव नसावा आणि नुसतं गाभाऱ्याचं दर्शन व्हावं, तसं आता झालं होतं. प्रतिष्ठानच्या कार्यालयात पाऊल टाकलं ते गालावर झरणारे अश्रू पुसतच.

प्रतिष्ठानच्या कार्यालयात पदाधिकारी मंडळी होती. त्यांनी विचारपूस केली. बसायला सांगितलं. बंद दरवाजाच्या पलिकडची तात्यासाहेबांची खोली कुलूप लावून बंद केलेली होती. इतर दोन खोल्या उघड्या होत्या. गेली २८ वर्षं तात्यासाहेबांच्या घराशी ऋणानुबंध

असलेल्या शांताबाई शहासने पाणी घेऊन आल्या. बाई म्हणजे तात्यासाहेबांच्या पत्नी. त्या वारल्यावर ७२ सालापासून शांताबाईंनी बाईंना वचन दिल्यानुसार तात्यासाहेबांची मुलीसारखी देखभाल केली. हिंगणे स्त्रीशिक्षण संस्थेतून आल्यावर मालुसरे यांच्या बंगल्यात नाशिकला पटेल कॉलनीत तात्यासाहेब जिथे रहात होते, तिथे त्या शेजारी रहात होत्या. नोकरी मिळेपर्यंत आमच्याकडे काम करा असं त्यांना बाईंनी सांगितलं आणि तेव्हापासून शांताबाई तात्यासाहेबांच्याच घरात काम करू लागल्या. ते त्यांच्या घरातल्या एक सदस्य होऊनच. बाईंच्या आजारपणात त्यांचं सगळं शांताबाईंनी केलं. बाईंनीही त्यांना मुलीसारखं सांभाळलं होतं. बाई म्हणजे मनोरमाबाई नगरपालिकेच्या शाळेत शिक्षिका होत्या. माहेरच्या त्या सोनवणी. तात्यासाहेबांच्या कवितेवरील प्रेमामुळे त्यांनी तात्यासाहेबांशी ओळख करून घेतली. परिचयाचे रूपांतर प्रेमात झाले आणि पुढे त्यांचे लग्नही झाले. त्या काळातील हा आंतरजातीय प्रेमविवाह होता. ज्या नटसम्राट नाटकाला दिगंत कीर्ती लाभली, त्याचा प्रयोग त्यांनी पाहिला होता. ७२ साली त्या दिवंगत झाल्या. बाई गेल्या आणि घरातली सगळी जबाबदारी शांताबाईंनी अंगावर घेतली. 'तात्यासाहेबांकडे येणाऱ्या मंडळींची सरबराई, त्यांचं जेवणखाण आदी त्यांच्या आवडीचं पिठलं, शेंगदाण्याची चटणी आणि कांद्याची भजी मी नेहेमी करायची' असं शांताबाई सांगत होत्या. 'जायच्या आदल्या दिवशी म्हणजे मंगळवारी मी त्यांना थालिपीठ करून दिलं होतं. त्या दिवशी घरात फिरले. बुधवारी सकाळी वाचन केलं त्यांनी. ११ वाजता त्यांचे भाऊ-भाऊजय आले भेटायला. त्यांच्याशी बोलले. देशपांडे डॉक्टर सकाळी येऊन त्यांना इंजेक्शन देऊन गेले होते. बारा वाजून दहा मिनिटांनी तात्यांनी अखेरचा श्वास घेतला.' एका युगकर्त्या साहित्यिकाचा अस्त झाला. शांताबाई त्यांच्या कितीतरी आठवणी सांगत होत्या. तात्यासाहेबांच्या निधनाच्या आघातांनी त्या कोलमडल्यासारख्या दिसत होत्या. अभ्यास अडला तर तात्यासाहेबांना विचारणारी रुक्मिणी आतमधल्या खोलीत अभ्यास करत होती. तात्यासाहेबांकडे काम करणाऱ्या ताराबाईंची रुक्मिणी आणि नामदेव ही मुलं तात्यासाहेबांकडेच काम करत शिकू लागली आणि तिथेच राहू लागली. 'तात्यासाहेब मला इंग्रजी शिकवायचे' असं रुक्मिणी सांगत होती. त्यांना क्रिकेटची मॅच पाहायला खूप आवडायचं. मीही त्यांच्याबरोबर मॅच पहायची टीव्हीवर. आजारी असताना ते स्कोअर विचारायचे. प्रत्येकाजवळ तात्यासाहेबांबरोबर घालवलेल्या क्षणांच्या सुखद आठवणी होत्या. समोरच्या काचेच्या कपाटात तात्यासाहेबांचे अनेक पुरस्कार मांडून ठेवलेले होते. काही फळीवर होते, काही टेबलावर. भारतीय ज्ञानपीठ पुरस्कार हा साहित्यातला सर्वोच्च पुरस्कार वि. स. खांडेकरांनंतर तात्यासाहेबांना मिळाला. अखिल भारतीय नाट्य संमेलन पुरस्कार, पद्मभूषण पुरस्कार, राष्ट्रपती पुरस्कार, नटसम्राटला मिळालेला पुरस्कार. त्यातील साहित्य अकादमीचा मिळालेला महत्त्वाचा. मराठी माती, स्वगत, हिमरेषा या कवितासंग्रहांना मिळालेले राज्यपुरस्कार, नाटकांना मिळालेले राज्य पुरस्कार, राजश्री शाहू छत्रपती पुरस्कार, नाशिक भूषण पुरस्कार - चांदीच्या करंडकातील मानपत्र त्यावेळी नाशिककरांनी त्यांना दिलं ते वाचण्यासारखं आहे. जागतिक मराठी परिषदेनी केलेला सन्मान, चतुरंग पुरस्कार, पानं पुरणार नाहीत एवढी यादी मोठी आहे. उजव्या भिंतीवर

तात्यासाहेबांनी स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवी वर्षात केलेली 'स्वातंत्र्य देवीची विनवणी' ही कविता लावलेली. आता हा 'फटका' सरकारी कार्यालयाच्या भिंतीभिंतीवर राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या तसबिरीप्रमाणे लावलाय. पन्नास ओळींचा हा फटका म्हणजे झणझणीत अंजनच.

*' पन्नाशीची उमर गाठली अभिवादन मज करू नका ।*
*मीच विनविते हात जोडुनी वाट वाकडी धरू नका ॥*
*भाषा मरता देशही मरतो संस्कृतिचाही दिवा विझे ।*
*गुलाम आणिक होऊनि अपुल्या प्रगतीचे शिर कापू नका ॥'*

किती परखडपणे विचार मांडले आहेत तात्यासाहेबांनी.

'स्त्री' विषयीची भूमिका स्पष्ट करताना ते म्हणतात,

*'समान मानव मान स्त्रीला तिची अस्मिता खुडू नका*
*दासी म्हणुनी पिटू नका वा देवी म्हणूनी भजू नका'*

प्रतिष्ठानच्या कार्यालयाला लागूनच 'मुक्तद्वार संदर्भ ग्रंथालय' आणि 'बालवाचनालय' आहे. नाशिकचं भूषण असलेलं दीडशे वर्षांची परंपरा लाभलेलं सार्वजनिक वाचनालय आणि पाच दशकांची परंपरा लाभलेलं लोकहितवादी मंडळ. या दोन्ही संस्था तात्यांना पुत्रवत होत्या. वाचनालयातर्फे त्यांनी अनेक उपक्रम राबवले. 'ग्रंथालये ज्ञानाची वेस आहे' असं मानणाऱ्या तात्यासाहेबांच्या रहात्या वास्तूतच प्रतिष्ठानतर्फे संदर्भ ग्रंथालय सुरू झालं आणि बाल वाचनालयही. त्यांना अभिप्रेत असलेल्या साहित्य, भाषा, विज्ञान आणि कला क्षेत्रातील कार्यास प्रोत्साहन देणे, त्यांना अभिप्रेत असे सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक कार्य करणे हा प्रतिष्ठानचा मुख्य हेतू. वाचनालयाची चळवळ आणि साखळी पद्धतीनी बालवाचनालय ह्या चळवळीने नाशिकात चांगलंच मूळ धरलं. तात्यासाहेब नुसतेच कलावंत नव्हते ते क्रियाशील कलावंत, साहित्यिक होते. त्यांनी नाशिकच्या आसपासच्या आदिवासींसाठी प्रतिष्ठानमार्फत अनेक उपक्रम सुरू केले. आदिवासी कार्यसमिती आस्तित्वात आली. वाचनालये तर अगदी खेड्यापाड्यातही त्यांच्या प्रेरणेने निर्माण झाली. साखळी बालवाचनालये निघाली. घरातच बालवाचनालय सुरू झाल्याने मुलं जेव्हा वाचायला तिथे येत तेव्हा तात्यासाहेब मुलांमध्ये मिसळून त्यांच्या वाचनाची चौकशी करत. तात्यासाहेबांना मुलं फार आवडत. मुलांनी इथे येऊन मुक्त वाचन करावं असं त्यांना वाटे. संदर्भ ग्रंथालयाच्या खोलीत काचेच्या कपाटात अनेक संदर्भग्रंथ तसेच तात्यासाहेबांची पुस्तकं ओळीने लावून ठेवलेली. जीवलहरी, विशाखा, समिधा, किनारा, मेघदूत, मराठी माती, स्वगत, हिमरेषा, वादळवेळ, रसयात्रा, (संपादित - बोरकर-वैद्य) छंदोमयी, मुक्तायन, पाथेय, नुकतंच प्रसिद्ध झालेलं मारवा, खेरीज एकांकिका, कादंबऱ्या, लघुकथा, बालसाहित्य, नाटकं, ललितनिबंध, समीक्षा अशी सर्व साहित्य प्रकारातील पुस्तकं. इथेच टेबलावर तात्यासाहेबांचा शिवराम कारंथांबरोबरचा फोटो. कारंथ त्यांना भेटायला इथे आले होते त्यावेळचा. तिथेच वि. स. खांडेकरांचाही फोटो. भाऊसाहेब खांडेकरांना तात्यासाहेब अतिशय मानत. १९४२ साली वि. स. खांडेकरांनी तात्यासाहेबांचा 'विशाखा' हा कवितासंग्रह स्वखर्चाने प्रसिद्ध केला होता.

वा. रा. कोठारींच्या प्रभातमध्ये तात्यासाहेब नोकरीला होते. १९३९ ची गोष्ट. तेव्हा कलकत्याच्या डमडम तुरुंगात शंभर-दीडशे स्वातंत्र्यसैनिकांनी उपोषण सुरू केले. पंचवीस-तीस दिवस झाले तरी ते उपोषण मागे घेईनात की सरकार यावर चर्चा करायला पुढे येईना. अजून उपोषण चालू राहिलं तर हे स्वातंत्र्यसैनिक मृत्यू पावतील असं वाटायला लागलं. या घटनेवर प्रभातकचेरीतच तात्यासाहेबांना कविता सुचली. त्यांनी ती तिथेच लिहिली. अन्नत्याग करून मृत्यूच्या दारात पाऊल टाकताना राजबंद्यांच्या ओठावर असलंच गाणं स्फुरलं नसेल काय?

*'गर्जा जयजयकार क्रांतिचा गर्जा जयजयकार*
*अन् वज्रांचे छातीवरती घ्या झेलून प्रहार !*
*खळखळू द्या या अदय शृंखला हातापायात*
*पोलादाची काय तमा मरणाच्या दारात?'*

*रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उष:काल* असा दुर्दम्य आशावाद व्यक्त करणारी ही कविता अशी स्फुरली-जन्मली. त्या वेळी ती ज्योत्स्ना मासिकातून प्रसिद्ध झाली. तमाम देशभक्तांसाठी, स्वातंत्र्यसंग्रामातलं एक प्रेरणा स्तोत्र बनली ही कविता. हजारो स्वातंत्र्यसैनिकांनी हे स्वातंत्र्याचं सूक्त आपल्या ओठावर घोळवलं. मनात रुजवलं.

*'श्वासांनो जा वायुसंगे ओलांडुनि भिंती*
*अन् आईला कळवा अमुच्या हृदयातिल खंत*
*आणि तिला सांगा,*
*तुझ्या मुक्तिचे एकच होते वेड परी अनिवार'*

स्वातंत्र्य मिळून आज पन्नास वर्षे होऊन गेली पण क्रांतिकारकांच्या त्यागाची महानता सांगणारं, त्यांच्या बलिदासाची अमर गाथा सांगणारं हे महन् मंगल स्तोत्र आजही हेच सांगतंय,

*'सरणावरती आज आमुची पेटतात प्रेते*
*उठतिल त्या ज्वालांतुन क्रांतीचे नेते '*

'विशाखा' प्रसिद्ध झालं आणि त्यातली झळाळती कविता रसिकांसमोर आली.

*'ध्येय प्रेम आशा यांची*
*होतसे का कधी पूर्ती'*

किती साध्या शब्दात हे कटू सत्य प्रियकर बोलून जातो म्हणूनच या अतिसुंदर प्रेमगीतातील प्रियकराच्या भावना विलक्षण सौंदर्यवेधी वृत्तीने रेखलेल्या आहेत. म्हणूनच हा वास्तवाचे भान असलेला प्रियकर म्हणतो :

*'काढ सखे गळ्यातील तुझे चांदण्याचे हात*
*क्षितिजाच्या पलीकडे उभे दिवसाचे दूत.'*

दूर मनोऱ्यात, हिमलाट, आगगाडी व जमीन, कोलंबसाचे गर्वगीत, पाचोळा, पृथ्वीचे प्रेमगीत किती कवितांची नावं घ्यावीत. ज्या कविता मनामध्ये चिरंतन रुजलेल्या आहेत.

माणसाच्या दुर्दम्य विजिगीषु महत्वाकांक्षेचं आणि अनंत अशा ध्येयासक्तीचं गीत म्हणजे कोलंबसाचं गर्वगीत -

*'अनंत अमुची ध्येयासक्ती अनंत अन् आशा*
*किनारा तुला पामराला'*

तात्यासाहेबांची पुस्तकं पहाता पहाता त्यांच्या अशा कितीतरी कविता मनात रुंजी घालू लागल्या.

या संदर्भ ग्रंथालयात अनेक संदर्भग्रंथ अभ्यासकांसाठी ठेवलेले आहेत. ग्रंथालयातून बाहेर पडून तात्यासाहेबांच्या खोलीजवळ जाऊन उभे राहिलो. खोली बंद होती, पण खिडकी उघडी असल्याने त्या रिकाम्या खोलीचं दर्शन झालं. सगळ्या वस्तू जशाच्या तशा ठेवलेल्या. उजव्या हाताला मीरेची मूर्ती, डाव्या बाजूला बैठ्या टेबलावर तात्यांची दैवतं, शेक्सपिअर आणि गोविंदाग्रज यांचा फोटो, डाव्या भिंतीशी कोपऱ्यात पलंग, भिंतीवर फुलदाणीचं पेंटिंग, पलंगावरच्या मच्छरदाणीच्या दांडीवर तात्यासाहेबांची सोनेरी मुठीची काठी आणि एक काठी टांगलेली, दोन मफलर, कॉटवर ट्रॅन्झिस्टर, उशा, लोड, चादरी, एका लोडाला टेकून तात्यासाहेबांचा फोटो, त्याला चंदनी हार घातलेला. तात्यासाहेबांची नेहमी बसायची आरामखुर्ची, कॉटलगत चपला. भिंतीवर बाईंचा फोटो. चेहऱ्यावर शांत संयत भाव.

दोन-अडीच तास या वास्तूत काढले. आता निघायला हवं होतं. प्रतिष्ठानच्या पदाधिकाऱ्यांचा निरोप घ्यायचा होता. निघताना तात्यासाहेबांची काही पुस्तकं विकत घेतली. 'अक्षरबाग' हा मुलांसाठी अतिशय सुंदर काढलेला संग्रह नुकताच प्रसिद्ध झालेला तोही विकत घेतला. निघता निघता प्रतिष्ठानच्या कार्याची थोडी माहिती मिळाली. प्रतिष्ठानतर्फे तात्यासाहेबांच्या प्रेरणेनी १५ साखळी वाचनालये सुरू झाली आहेत. सहा आदिवासी गावांमध्ये कार्य चालू आहे. आदिवासी कार्यसमितीच अस्तित्वात आली आहे. त्र्यंबक, जव्हार आदी सहा गावातून वाचनालयं सुरू झाली आहेत. तसेच वैद्यकीय मदतही. शुद्धलेखनाचे वर्ग घ्यावेत असं तात्यासाहेबांना वाटत होतं. नाशिक, धुळे इथे त्यांची कल्पना राबवणार. निघताना श्री. हेमंत टकले म्हणाले, 'तात्यासाहेबांचा जन्म पुण्यात ज्या घरात झाला, त्या घरावर फलक लावावा म्हणून गेली दोन वर्षं आम्ही प्रयत्नशील आहोत. पुणे महानगरपालिकेशी त्या संबंधात पत्रव्यवहार केला आहे. पण अजून काही ते काम होत नाहीये. तुम्ही पुण्याहून आला आहात तर जरा लक्ष घाला. मी त्यांना निश्चितपणे त्यासाठी प्रयत्न करीन असं आश्वासन दिलं. विशेष म्हणजे नुकताच हा नामफलक त्यांच्या पुण्यातील घरावर लागला आहे. तात्यासाहेबांच्या वास्तूचा निरोप घेऊन आम्ही निघालो. तात्यासाहेबांचं शिरवाड-पिंपळगाव पहायचं होतं. वाटेत भोजन घेऊन पुढचा प्रवास करायचा होता.

नाशिकहून आग्रारोडला पिंपळगाव सुमारे वीस मैलांवर. पिंपळगाव बसवंतपासून पाच मैलांवर शिरवाड हे तात्यासाहेबांचं मूळ गाव. हे निफाड तालुक्यात येते. उन्हाळ्याचे दिवस असल्याने ऊन चांगलंच तापलं होते. रस्ता सरळ होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूला नजर टाकली की मात्र डोळ्यांला हिरवाईचं सुख वाटत होतं. वाटेत झाडी तुरळक पण दोन्ही बाजूंनी

द्राक्षांच्या बागा आणि सिझन असल्यामुळे वेलांना घोसच्या घोस लगडलेले होते. ते दृश्य मोठं विलोभनीय दिसत होतं. 'मायदेशचा वारा' या कवितेतलं वर्णन साक्षात् डोळ्यांपुढे होतं —

*'द्राक्षांचे बहरत बाग मनोहर जेथे*
*त्या सुनीत वेली रांग पऱ्यांची गमते*
*लेऊन उभ्या जणु हिरव्या नव वसनाते*
*कटिकष्ठावरती वरती मौक्तिकहारा*
*हा काय माझिया मायदेशचा वारा'*

द्राक्षासाठी प्रसिद्ध असलेलं हे गाव. या गावात तात्यासाहेबांचं बालपण गेलं. वाटेत पाराशरी नदी लागली. पाराशरी नदीचा विळखा या गावाभोवती. पावसाळ्यात ही नदी दुथडी भरून वहाते. पण आता तिला फारसं पाणी नव्हतं. तीन रस्त्यांचं हे मोठ गाव. मोठा रस्ता बाजारपेठेचा. गावात दहा-पंधरा वकिलांची घरं. तात्यासाहेबांचे आजोबा नागेश गणेश शिरवाडकर हे स्वातंत्र्यप्रेमाच्या आणि शिक्षणाच्या ओढीने नाशिकला येऊन मॅट्रिकनंतर शिक्षण खात्यात नोकरीला लागले. दामोदर व रंगनाथ या आपल्या दोन मुलांना त्यांनी उत्तम शिकविले. दामोदर महसूल खात्यात नोकरीस लागले तर रंगनाथ वकिलीचा अभ्यास करू लागले. वकिलीचा अभ्यास करत असताना कुसुमाग्रजांचे वडील, आजोबांचे वास्तव्य पुण्यात होते. निंबाळकर तालमीजवळील लिमये वाड्यात त्यावेळी त्यांचे बिऱ्हाड होते. तात्यासाहेबांचा जन्म या लिमयांच्या वाड्यात झाला. तात्यासाहेबांचा जन्म झाला आणि थोडेच दिवसांत ही मंडळी आपल्या मूळ गावी परत गेली. शिरवाडपासून जवळ असलेल्या पिंपळगावी कोर्ट होतं. वकिलांमुळे त्या गावाला मध्यमवर्गीय संस्कृतीचा स्पर्श झाला होता. माधवराव टकले, अप्पासाहेब प्रधान हे नावाजलेले वकील इथे होते. तात्यासाहेबांचे वडील येथे येऊन स्थायिक झाले. ते प्रमुख कायदेतज्ञ मानले जात. पिंपळगावाने कृषिक्षेत्रात क्रांती केली होती. तात्यासाहेबांचे वडील पिंपळगावी शेती करत. ५-६ मैलांवर असलेल्या आपल्या या गावी-शिरवाड्याला जाऊन शेतीवर देखरेख करत. कांदा, द्राक्षमळा, पानमळा अशी मोठी शेती होती त्यांची. त्यांना सात मुलं आणि एक मुलगी. सर्वजण त्यांना दादा म्हणत. तात्यासाहेबांच्या आईचं माहेर नाशिकच्या जानोरीकरांकडचे. तात्यासाहेब भावंडांत दोन नंबरचे. नाव गजानन पण वयाच्या आठव्या-नवव्या वर्षी ते चुलत घरात दत्तक गेले आणि विष्णु वामन शिरवाडकर या नावाने ओळखले जाऊ लागले. घरात आणि साहित्यसृष्टीत मात्र सर्वजण त्यांना तात्यासाहेबच म्हणत. त्यांचं प्राथमिक शिक्षण पिंपळगावच्या शाळेत झालं. गावात पराशरी नदीच्या किनाऱ्यावर पाच-सहा मंदिरं आहेत. गावात मुख्य रस्त्यावर मध्यभागी बसवंतेश्वराचं मंदिर आहे. या देवळाच्या नावावरून या गावाला पिंपळगाव बसवंत असंही संबोधलं जातं. पूर्वी डाक बंगल्याजवळ नदी किनाऱ्यावर वडाची पुष्कळ झाडं होती. आणि समोरच्या बाजूला प्रचंड मोठं वडाचं झाड होतं. अनेक पक्षी या झाडावर आसऱ्याला येत. मोठमोठी पोळी झाडाला लटकलेली असत. वटवाघळं, कावळे, घारी या साऱ्यांची घरं या झाडावर असायची. गावकरी याला 'ईश्वरी वड' म्हणत. चाळीस-पन्नास वर्षांपूर्वी बांधकाम खात्याने हे वडाचं झाड तोडलं.

'विराट वड' ही या भव्य वटवृक्षाला उद्देशून लिहिलेली कविता -

*'काळाची असंख्य पाखरे आली*
*जीवन-कणिका टिपून गेली*
*अनेक पिढ्यांची यात्रा विशाल*
*तयाच्या पुढून गेलेली पैल*
*काळाशी झुंजून राहिला जेता*
*विजयपरी तो जाचतो आता'*

एका विराट वडाची ही केविलवाणी कथा-गावाबाहेर एका बाजूला पसरलेला माळ आणि छोट्या छोट्या टेकड्या. वृक्षराईतून वाहणारी पाराशरी आणि 'गावाच्या सीमेस नदीच्या तीरा, पारंब्या फांद्यांच्या घालून डेरा' असा हा 'ईश्वरी वड' आता 'कवितारूप' होऊन उरलाय. पिंपळगावावरून पुढे जाताना डाव्या हाताला 'गधी माशाचं पैदासकेंद्र' अशी पाटी लागली. सरळ रस्त्याने पुढे अर्ध्या-पाऊण तासाच्या अंतरावरच शिरवाड गाव येतं. हे तात्यासाहेवांचं मूळ गाव. इथे वडिलोपार्जित घर-शेती.

रस्त्याच्या उजव्या हाताला कविवर्य कुसुमाग्रज विद्यालय अशी पाटी दिसली. त्या रस्त्याने आत शिरवाड्याकडे जायला रस्ता. थेट जाऊन गावात पोहोचलो तो चौकशी करायला थांबलो. तिथे पूर्व प्राथमिक विद्यामंदिराची पाटी दिसली. आवारात काही मंडळी दिसली. त्यांच्याकडे चौकशी केली. तात्यासाहेव शिरवाडकरांचं घर कुठे आहे याची. त्यांच्यातलेच एक-दोघेजण उठून घर दाखवायला आले. खरं तर वळसा घालून चालत जायला अंतर जरा जास्त होतं. पण निफाडे यांच्या घरातून पलीकडच्या रस्त्यावर जायला जवळचा रस्ता होता. निफाडे यांच्याकडे पाणी वगैरे घेतलं. कुठून आलोय वगैरे चौकशी झाली. थोड्यावेळ टेकलो आणि गावात फेरफटका मारण्यासाठी निघालो. निफाडे यांचं घर मागच्या बाजूनी जुनं दिसत होतं. पण पुढच्या बाजूनी नवीन बांधलेलं दिसत होतं. बरोबर त्यांच्या दोन मुली आणि एक-दोन ग्रामस्थ मंडळी. पूर्व प्राथमिक विद्यालयाची पुढील बाजू त्या रस्त्याने लागली. शाळेसमोरच मोठा पिंपळपार. इथे पूर्वी जुना मोठा पिंपळ होता. तो पडला. त्याजागी हे दुसरं पिंपळाचं झाड लावलेलं. हेही खूप मोठं. या पिंपळपारासमोरच तात्यासाहेवांचं वडिलोपार्जित घर. पण आता पुढच्या बाजूनी संपूर्ण नवीन बांधकाम केलेलं. मागच्या बाजूला जुनं पडिक घर. ते अगदी मोडकळीला आलेल्या स्थितीत. शिरवाडकरांपैकी गावात कुणीही रहात नाही. जुन्या घरातल्या चौकात लक्ष्मीनारायणाचं मंदिर आहे. तेही बंद होतं. गोकुळअष्टमी आणि रामनवमीच्या दिवशी उत्सवाच्या वेळी उघडतात असं कळलं. या घरापासून काही अंतरावर थोडं चढावर आणखी एक घर ग्रामस्थांनी दाखवलं. पाठीमागे खूप मोकळी पडिक जागा. पुढे बिऱ्हाड. हे तात्यासाहेवांचं भाऊबंदकीतलं घर. या जागेत फेरफटका मारून आलो.

७९ साली गावात वाचनालय सुरू झालं. सदानंद वर्दे उद्घाटनाला आले होते. स्वत: तात्यासाहेबही आले होते. ग्रामस्थांनी माहिती पुरवली. ८२ साली इथे बालवाडी सुरू झाली. ८४ साली तात्यासाहेवांच्या प्रेरणेनी गावात पाणी आलं, नाहीतर इथे पाण्याचा फार मोठा प्रश्न

होता. कुसुमाग्रज माध्यमिक विद्यालयाची स्थापना ८६ साली झाली. नाशिक जिल्हा मराठा प्रसारक संघातर्फे ५ वी ते १० ची शाळा आहे. भावी पिढी सुशिक्षित व्हायला हवी. चालत चालत आम्ही बरंच पुढे येऊन पोहोचलो. तिथे एका फणसाच्या झाडाकडे बोट दाखवत ग्रामस्थांनी सांगितलं. तात्यासाहेब इथे येत. बरोबर मित्रमंडळी असत. या फणसाच्या झाडाखाली बसून ते भोजन करत. द्राक्षाच्या सिझनमध्ये तात्यासाहेबांचं इथं हमखास येणं होई. गावात शाळा, बालवाडी, पाणी या साऱ्या गोष्टींच्या सुधारणा झाल्या. पण गावाचा चेहरा-मोहरा फारसा बदललेला दिसत नव्हता. गावातला फेरफटका संपला. निरोप घ्यायला निफाडे यांच्या घरी गेलो. तर श्री. निफाडे बाहेरून आलेले दिसत होते. हे वकिली करतात. त्यांची द्राक्षाची बाग आहे. तात्यासाहेब प्रत्येक सिझनला आमच्या बागेतली द्राक्षं खायला येत. द्राक्षाच्या बागेत, त्यांच्या घरात तात्यासाहेबांबरोबर काढलेल्या दोन-तीन फोटोंचे अल्बमच त्यंनी दाखवायला आणले. त्यांच्या बैठकीच्या खोलीतही तात्यासाहेबांबरोबरचे फोटो लावलेले होते. तात्यासाहेबांबद्दलचा आदर त्यांच्या शब्दाशब्दातून डोकावत होता. तात्यासाहेब आम्हा सर्वांचे मार्गदर्शक होते. तात्यांना ग्रामीण भागशेतीची जाण होती. आपल्या ग्रामीण भागातली घरं चांगली व्हायला हवीत. घरं तिथे संडास हवा. गाव स्वच्छ हवं, अशी त्यांची कळकळ असे. निफाडे सांगत होते. तात्यासाहेबांना ज्ञानपीठ पुरस्कार मिळाला, तेव्हा तर गावानी दिवाळीच साजरी केली. गावातले आबाल-वृद्ध ५०० मंडळी नाशिकला तात्यांच्या भेटीला गेली. आणि जाऊन तिथे त्यांचा सत्कार केला. माझ्यावर तर त्यांनी पुत्रवत प्रेम केलं. ७८ साली मी वकिली पास झालो, तेव्हा त्यांनी माझा सत्कार केला. आठवणी या न संपणाऱ्या. चहापाणी झालं. आम्ही जायला निघालो. पायात चपला सरकावताना घराच्या नावाकडे लक्ष गेलं. 'कुसुमाग्रज स्नेह' असं नाव निफाड्यांनी आपल्या घराला दिलंय. तात्यासाहेबांविषयीच्या भावना त्यातून व्यक्त झाल्या आहेत. निघताना ते म्हणाले, 'तात्यासाहेब आमचे दैवत होते' मी मनात म्हटलं, तुमचे काय सर्वांचेच ते दैवत होते.

ग्रामस्थांचा निरोप घेऊन परतीचा प्रवास सुरू झाला. परत तीच तीच स्थळं नजरेसमोरून जात होती. पाराशरीचा पूल ओलांडून पुढे निघालो. नदी बरीचशी आटलेली होती.

*'रित्या नद्या सुकलेले डोंगर*
*भकास राने उदास डोंगर*
*कृतज्ञतेने बघती, श्रवती मेघांचे ललकार !'*

'वर्षागमन'मधल्या या ओळी मनात आल्या. कुठूनतरी पावसाच्या सरी धरणीवर कोसळाव्यात आणि वातावरण थंड व्हावं असं वाटत होतं. द्राक्षांच्या बागांमधले घड उतरविण्याचं काम चाललेलं संपलं असावं. संध्याकाळ व्हायला आली होती. तोडलेले घड प्लॅस्टिकच्या ट्रेमधून आणि खोक्यामधून ट्रक्सवर चढवले जात होते. या सिझनमध्ये इथे द्राक्षांचा बाजार असा तेजीत असतो. तासा-दीड तासाचं अंतर कापून आम्ही नाशकात येऊन ठेपलो. आता गोदाकाठच्या तीरावर फेरफटका मारायचा. नाशिकमध्ये थोडं फार हिंडून घ्यायचं असं ठरवलं.

नाशिक ही ऋषींची तपोभूमी. सिद्धांची योगभूमी आणि मानवाची मोक्षभूमी मानली जाते.



अनुक्रमणिका

प्रभू रामचंद्रांच्या पदस्पर्शानी पूनित झालेली ही भूमी. हे पुण्यक्षेत्र गोदावरीच्या तीरावर वसलेलं. नाशिक आणि पंचवटी मिळून नाशिक क्षेत्र. या दोन स्थलांमधून गोदावरी नदी वाहते. तिच्या दक्षिण तिरावरल्या भागाला नाशिक आणि उत्तर तिरावरच्या भागाला पंचवटी म्हणतात. इथे गोदावरीच्या दोन्ही तिरांवर देवालये आहेत. द्वापारयुगात या क्षेत्राला जनस्थान या नावाने संबोधत. कुसुमाग्रज प्रतिष्ठानच्या वतीने मराठीतल्या एका उत्तम साहित्यिकाला याच नावाने पुरस्कार देण्यात येतो. या पुरस्काराला जनस्थान हे नाव का दिलं असेल याची उकल अशी झाली. १७ व्या शतकात हे शहर मोगलांच्या अधिपत्याखाली होते. त्या काळात याचं नाव 'गुलशनाबाद' ठेवण्यात आलं. या काळात इथली अनेक मंदिरं पाडून इथे मशिदी स्थापन करण्यात आल्या. १७ व्या शतकाच्या अखेरीस मात्र मराठ्यांनी परत इथे आपला अंमल बसवला. पेशव्यांनी सरस्वती पुलाच्या पलीकडे नवापुरा वसवला. मुसलमानांनी पाडलेली मंदिरं पुन्हा उभी केली. गोदावरीच्या पात्रात अनेक कुंड बांधली. गंगापूर-नाशिक इथे मोठे मोठे वाडे बांधले. रामकुंडाजवळील गंगामंदिरात गंगामातेची आरती चालू होती. घाटावर आजूबाजूला माणसांची गजबज होती. कोणी द्रोणातील दीप विकत घेऊन कुंडामध्ये सोडत होते. पाण्याच्या झिळमिळ लाटांवरील वहात जाणाऱ्या असंख्य दिव्यांची ती दीपावली. वातावरणातले आरती सुस्वर, मावळलेले संध्यारंग, आकाशातला नीलिमा, घाटावरचा तो माहोल काही औरच होता. तात्यासाहेबांसारख्या प्रतिभावंत कलावंताचा निवास असलेली ही संपन्न नगरी मराठीतील किमान तीन पिढ्यांना प्रेमाची साद घालत राहिली. पाच दशकाहून जास्त काळ तात्यासाहेबांचं इथं वास्तव्य होतं. पुणं ही त्यांची जन्मभूमी पण नाशिक ही त्यांची कर्मभूमी. पुराणकाळात या भूमीत अनेक ऋषीमुनी, तापसींचं इथं वास्तव्य होतं. या युगात, या भूमीत तात्यासाहेबांसारखा एक ऋषीवर होऊन गेला ही नाशिककरांच्या दृष्टीने अभिमानाची गोष्ट. गोदामाईच्या विशाल पात्रात उन्हाळा असूनही पाणी खळाळत होतं. तात्यासाहेबांना ज्ञानपीठ पुरस्कार मिळाला तेव्हा आपल्या मनोगतात ते म्हणाले होते — 'एकूण सर्वच साहित्याची निर्मिती ही नदीच्या उगमाप्रमाणे एक नैसर्गिक आणि निरपेक्ष घटना असते. पण नदी ही उगमापाशी थांबत नाही. थांबली तर ती नदीच होऊ शकत नाही. काव्यासारखे साहित्यही उगमापाशी थांबत नाही. नदीप्रमाणे आत्मतेची शीव ओलांडून ते लोकजीवनात प्रवेश करते हा प्रवेश सफल होणे, म्हणजेच जे एकाचे आहे, ते अनेकांचे होणे. आत्मविष्काराचे रूपांतर सामाजिक संवादामध्ये होणे असे मी मानतो. साहित्यसाधनेच्या सफलतेचा आणि सार्थकतेचा हाच एक अर्थ आहे. ही सफलता लाभल्याचे समाधान ज्ञानपीठासारख्या पुरस्काराने लेखकाला, कवीला प्राप्त होते ते मलाही लाभले आहे.' तात्यासाहेब एवढंच सांगून थांबले नाहीत. ते पुढे म्हणाले, 'हा गौरव माझ्या मायभाषेचा जिच्या खांद्यावर मी उभा आहे त्या वाङ्मयीन परंपरेचा आणि ज्यांच्या हातात हात घालून मी आज प्रवास करतो आहे, त्या समकालीन साहित्यिकांचाही आहे.' किती उत्तम विचार होते त्यांचे, याची ही एक झलक. नाशिकला तात्यासाहेबांनी मोठे केले आणि या नाशिकनी तात्यासाहेबांना. गोदाकाठच्या या तीरावर बसून तात्यासाहेबांच्या कितीतरी कविता आठवत होत्या. गोदाकाठचा संधिकाळ

कविता स्मरत होती. गोदाकाठच्या संध्याकाळचे ते एक मनोवेधक चित्र आहे. गरुड पंखांनी येणारा काळोख, कापऱ्या पाण्यावरच्या वृक्षांच्या थरथरत्या सावल्या... रातकिड्यांचा तीव्र स्वर, आतुर अंत:करणाच्या आणि कातर डोळ्यांच्या ग्रामीण युवतींची द्रुत लयीतली पावले, पिसारा झडल्यासारखा पांढरा ढग, शुक्राचे मोहक चांदणे, शहरातले मिणमिणते दिवे, गंगेतल्या आपल्या प्रतिबिंबावर खिन्नपणाने दृष्टी लावून राहिलेला पडका वाडा, भंगलेले पण आतली मूर्ती जपत राहिलेले देऊळ ही सगळीच दृश्ये डोळ्यांसमोर चलत्‌चित्राप्रमाणे येऊ लागली.

*'पाचोळ्यावर का ही सळसळ*
*कसली डोहावरती खळवळ*
*पाऊल वाजे रजनीचे का येताना जगती'*

कवितेच्या ओळी आठवतातना भानावर येणं झालं. खरोखरच आता रात्र झाली होती. पण आजूबाजूला गजवज तशीच होती. खरंच नाशिकही आता चोहो अंगांनी खूप वाढत गेलंय. अगदी ७-८ लाखांची तरी वस्ती झालीय. तात्यासाहेब नाशकात शिकायला आले तेव्हा नाशकाची वस्ती होती अवघी चाळीस-पन्नास हजार. शहराच्या बाहेर हायस्कूल, कोर्ट, कलेक्टर कचेरीच्या भव्य इमारती होत्या. ती शहरवस्तीची सीमा होती. इथल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये म्हणजे आता सुगंधा हायस्कूलात तात्यासाहेबांचं मॅट्रिकपर्यंतचं शिक्षण झालं. त्यावेळी ते आजोळी रहात असत. तात्यासाहेबांची आई २९ साली वारली. नाशिक हे त्यांचं माहेरगाव असल्याने पिंपळगावहून त्यांचं नेहमी येणं होई. त्या वेळच्या नाशिकचं वर्णन





अनुक्रमणिका






तात्यासाहेबांनी फार छान केलंय ते मुळातूनच वाचायला हवं. 'दर शनिवारी आणि बुधवारी येथे गंगेच्या तिरावर बाजार भरायचा. नाशिक हे त्यावेळेपासूनच जिल्ह्याचं ठिकाण होतं. इथे टांगा आणि आणि ट्राम. टांग्यात बसणं श्रीमंतांचं लक्षण समजलं जाई. वहुजन समाज हा ट्रामनी जायचा. टांग्यासाठी चार आणे तर ट्रामसाठी दोन आणे तिकिट होतं. सध्या जिथे नगरपालिकेची इमारत आहे, तिथे ट्रामचं स्टेशन होतं. तेथून ती मेनरोडने निघून पुढे घासबाजाराजवळ गावाबाहेर पडायची. तेथून पुढे मुख्य रस्त्याच्या कडेने तिचा स्वतंत्र रूळ होता. सुमारे अर्ध्या तासात ती स्टेशनपर्यंत जात असे. गावातील प्रमुख वाजारपेठा म्हणजे कापड पेठ, बोहरपट्टी आणि संमिश्र बाजारासाठी मेन रोड. क्षेत्रात एक व्यापार एक दुकान अशी परिस्थिती होती. सोडावॉटरसाठी पटेल, मिठाईसाठी पांडे, चहासाठी भगवंतराव, कागद पुस्तकासाठी पाठक, चिवड्यासाठी कोंडाजी मकाजी अशी समीकरणे होती. शहराचा एकूण तोंडावळा क्षेत्राचाच. भिक्षुकी व्यवसाय तेजीत होता. नाशिकात गोदावरीला गंगा म्हणतात. या घाटावर वर्षातून दोन-तीन यात्रा भरत. गावातलं एकमेव करमणुकीचं थिएटर विजयानंद. या थिएटरमध्ये मी पहिलं नाटक पाहिलं. ते आनंदाविलास कंपनीचं कुंजविहारी. मुलांसाठी निम्म्या दराचं तिकिट असे. शिक्षणासाठी इथे मी २३ सालाच्या सुमारास आले आणि पुढील ७-८ वर्षांत इथे खूप वदल होत गेले. नाशिकात एच्. पी. टी. कॉलेज निघालं आणि नाशिकच्या जीवनात, संस्कृतीत परिवर्तनाला प्रारंभ झाला. शहराच्या विकासाला हातभार लावणाऱ्या महत्त्वाच्या संस्था सार्वजनिक वाचनालय, केतकर टाऊन हॉल, वसंत व्याख्यानमाला या संस्था तेव्हाही आपापल्या क्षेत्रात कार्यरत होत्या. त्या काळात नाशिकला तीर्थक्षेत्र म्हणून संवोधलं जाई. आता औद्योगिक, सांस्कृतिक आणि शैक्षणिक शहर म्हणून सन्मानलं जातं.' त्यावेळचं नाशिक जसच्या तसं या वर्णनावरून डोळ्यांपुढं उभं राहतं. अहा ते सुंदर दिन हरपले असंही म्हणावसं वाटतं.

तात्यासाहेवांवर साहित्याचे संस्कार घरातूनच झाले. त्यांना घडविण्यात त्यांच्या शाळेचा न्यू इंग्लिश स्कूलचाही वाटा होता. त्यांचे वडील साहित्यप्रेमी होते. घरात उत्तमोत्तम पुस्तकं वाचायला होती. आईच्या माहेरचा जानोरकर मंडळींचा साहित्याशी प्रत्यक्ष संवंध होता. त्यांचे मोठे मामा राजाराम हे कादंवरीलेखक होते. धाकटे मामा गंगाधर कवी होतं. त्यांच्याकडूनही तात्यासाहेवांना स्फूर्ती मिळाली. वणी येथील इनामदार देशपांडे यांच्याकडे दिलेल्या आत्याच्या घरी सुट्टीत जाण्यासाठी त्यांना आकर्षण होतं ते तिथल्या पुस्तकांचं. या आत्याचा मोठा वाडा होंता. वाड्याच्या मागे असलेला वणीचा सप्तशृंग डोंगर त्यांना फार आवडे. वणीच्या परिसराचा फार मोठा प्रभाव त्यांच्यावर होता. आणि तिथल्या पुस्तकांचं आकर्षण. राम गणेश गडकरी, खाडिलकर, चिपळूणकरांची कितीतरी पुस्तकं त्यांनी इथेच वाचून काढली. एडगर वॉलेस, पी. जी. वुडहाऊसची विनोदी कथांची पुस्तकं त्यांनी वाचली, आणि पुढच्या सात-आठ वर्षांत केशवसुतांपासून यशवंत गिरीशांपर्यंतच्या कवींच्या कविताही त्यांनी वाचल्या. कॉलेजच्या अभ्यासक्रमात गोल्डन ट्रेझरीचा अभ्यास झाला. त्यांना हे इंग्लिश काव्याचं बायवल वाटायचं. दत्तोपंत पुरोहित नावाचे एक शिक्षक इतिहास शिकवीत. त्यांनी एका दत्तक तासाला भा. रा.

तांबे यांची नदीच्या शेजारी गडाच्या खिंडारी ही कविता शिकविली. त्यावेळी बालवयात कविता म्हणजे काय हे कळालं आणि तिच्यावरून प्रेरणा घेऊन मी काव्याच्या गंधर्वनगरीत प्रवेश केला, असं तात्यासाहेबांनी एका ठिकाणी म्हटलंय. तेव्हापासून कवितेचा हात त्यांनी पकडला तो अगदी अंतापर्यंत. कवितेच्या समिधा घेऊन सामान्य माणसाच्या आंतरअग्नि फुलविण्याच्या मनीषेने निघालेल्या कवीने अखेरपर्यंत ही वाट चालती ठेवली. ही कवितेची वाट चालण्यासाठी त्यांनी आपली वहीण कुसुम हिच्या नावावरून 'कुसुमाग्रज' हे कविता-लेखनासाठी टोपणनाव घेतलं आणि त्याच नावानी त्यांनी आपल्या कविता प्रसिद्ध केल्या. सत्तर वर्षांपूर्वी बालबोधमेवा या मासिकात ९ सप्टेंबर १९२९ ला त्यांची पहिली कविता प्रसिद्ध झाली. त्या काळात त्यांना दे. ना. टिळक, रा. श्री. जोग, या. मु. पाठक यांनी कवितेसाठी खूप उत्तेजन दिले. ज्योत्स्ना मासिकात त्यांची स्वप्नांची समाप्ती या प्रसिद्ध झालेल्या कवितेमुळे त्यांच्या कवितेचे प्रारंभपर्व संपले. ज्योत्स्नामध्ये त्यांच्या कविता प्रकाशित होऊ लागल्या. 'विशाखा'मध्ये समाविष्ट झालेल्या त्यांच्या बहुसंख्य कविता ज्योत्स्ना मासिकात पहिल्यांदा प्रसिद्ध झालेल्या आहेत. बालाजी मंदिराच्या पुढच्या अंगणाच्या तटबंदीपलीकडे एका चाळीत त्यावेळी तात्यासाहेब रहात. खोलीच्या खिडकीतून गंगाकाठचा रमणीय देखावा दिसत असे. या खोलीतच त्यांचं सुरुवातीचं कितीतरी लेखन झालं. पुढे अखंडपणे ते लिहितच राहिले. त्यांची जीवननिष्ठा साहित्यामार्फत रसिकांपर्यंत पोहोचत राहिली. सुख-दु:खाचा काळ ओलांडून जाणारे हे कविवर्य मारवा या आपल्या अखेरच्या कवितासंग्रहातील एका कवितेत लिहितात,

*'वाजत गाजत वरात आता वेशीपाशी आली आहे*
*जिव्हाळ्याच्या चिता पेटवीत बरीच पायपीट झाली आहे*
*माथ्यावरचा आभाळवावा सवाल आता पुसत नाही*
*पृथ्वी झाली पावलापुरती आल्याडपल्याड दिसत नाही'*

हे असे उदासीचे स्वर क्वचित चिंतनातूनही आले असावेत.

आम्ही जिथे बसलो होतो, त्या गोदातिरावर समोरच असलेल्या 'अमरधाम'मध्ये तात्यासाहेबांवर अत्यंसंस्कार झाले. कधी एकेकाळी श्रांतपणे याच गोदाकाठच्या घाटावर डोके टेकून शांतवताना काळोखातून सैगलची तान कानावर पडलेली. त्यावेळी त्याच्या आवाजातील मोहक धार, लयीतील आर्तता, स्वरातून वाहणारे मार्दव यांनी मंत्रमुग्ध होऊन तात्यासाहेबांनी आपल्या कवितेत म्हटलं होतं -

*'हृदयातील रणे जाहली क्षणामध्ये शांत*
*आणि विस्मृतीच्या नाहती चांदण्यात रात*
*अशीच संगीते आळवी तुझी कलावंत*
*घडिभर जागव रे आमुची अशीच मानवता।'*

अखेरची अंत्ययात्रा गोदातटाकी आल्यावर असं काही स्मरलं असेल का? संध्यासमयी गोदातटाकी असे कितीतरी विचार मनात तरंगत होते. रात्र चढली होती. 'अमरधाम'च्या दिशेला विनम्रपणे हात जोडून गोदामाईचा निरोप घेतला.

तात्यासाहेब आता कधीही भेटणार नाहीत, याची वास्तव जाणीव झाली. पण त्यांनी आपल्या एका कवितेत म्हटलंय त्याचं समाधान मानत हे शाश्वत सत्यही स्वीकारायला हवं —

*'जाता जाता गाईन मी*
*गाता गाता जाईन मी*
*गेल्यावरही या गगनातील*
*गीतांमधुनी राहीन मी.'*

❑

मंदा खांडगे
२४, ऋणानुबंध सोसायटी, औंध, पुणे ४११ ००७.

---

## स्वागत

- ❑ **मोरू :** मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई
- ❑ **सुरदास :** मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई
- ❑ **कविता, माणसाच्या माणसासाठी :** मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई
- ❑ **अश्वत्थ :** प्रा. जयंत किनरे, प्रियांजली प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३०३
- ❑ **एक अस्वस्थ हिंदूमन :** प्रि. खं. कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६०
- ❑ **पुण्याचे पेशवे :** अ. रा. कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४२
- ❑ **अशी होती शिवशाही :** अ. रा. कुलकर्णी, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १४०
- ❑ **तरीही येतो वास फुलांना :** म. वा. धोंड, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७८
- ❑ **आपला स्वातंत्र्य लढा :** वि. स. वाळिंबे, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६०
- ❑ **प्रबोधन पर्व :** प्रा. कुसुम कुलकर्णी, सिंहवाणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे १८४
- ❑ **प्रकाशनगरी काशी :** पुष्पा त्रिलोककर, सिंहवाणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे १५९
- ❑ **आपण आणि आपली प्रकृति :** डॉ. ह. वि. सरदेसाई, सिंहवाणी प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे २९६
- ❑ **स्वातंत्र्य संग्राम-ज्ञात व अज्ञात :** वि. स. वाळिंबे, नवचैतन्य प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १९२
- ❑ **हसरी कविता :** मधुवंती सप्रे, संवेदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६४
- ❑ **ऋतुमंजिरी :** मधुवंती सप्रे, संवेदना प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ६०
- ❑ **शेरी :** मधुवंती सप्रे, संवेदना प्रकाशन; मुंबई, पृष्ठे ७२
- ❑ **जंजाळ :** अविनाश गायकवाड, आशय प्रकाशन, पृष्ठे ६४
- ❑ **हृदयस्पर्शी :** अंजली कुलकर्णी, पुष्प प्रकाशन लि., पुणे, पृष्ठे ५४
- ❑ **विख्यात फ्रेंच कविता :** अनुवाद : मीरा गुजारी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०२



अनुक्रमणिका

# अजोड जिन्दादिल — भाऊसाहेब पाटणकर

सदानंद कृ. देशपांडे

***जिन्दादिली जपणारा शायर***

*भाऊसाहेब पाटणकर हे मूळचे यवतमाळचे. ते पेशाने वकील होते. त्यांना शिकारीचा फार नाद होता. वाघाची समोरासमोर शिकार करणाऱ्या शिकाऱ्यांत त्यांची गणना झालेली होती. शिकार करण्यासाठी बंदूक सांभाळणारे भाऊसाहेब अत्यंत हळूवारपणे त्याच हातात लेखणी घेत आणि आपल्या प्रतिभाविलासाने रसिकांची मने काबीज करत.*

*साधारणत: १९६० साली म्हणजे त्यांच्या वयाच्या बावन्नाव्या वर्षी त्यांना दृष्टिदोष निर्माण झाला. मग त्यांनी आपल्या वकिली पेशाला रामराम ठोकला व ते शायरीकडे वळले. खरंतर अशावेळी एखादा वृद्ध मनुष्य खचून गेला असता व अंथरुणावर चुपचाप पडून राहिला असता. परंतु भाऊसाहेबांनी लेखणी हातात घेतली.*

*त्याकाळी विदर्भात मुशायरे (उर्दू शेरोशायरीचा कार्यक्रम) मोठ्या प्रमाणात व्हायचे. उर्दू शायरीच्या चाहत्यांमध्ये मराठी माणसांचा सुद्धा सहभाग असायचा. भाऊसाहेबांच्या शायरीची खरी सुरुवात येथेच झाली. भजन-कीर्तनात रमणारी मराठी माणसे शायरी करूच शकत नाहीत व शायरी ऐकण्याकरता लागणारी रसिकता त्यांच्या अंगी बिलकूल नाही, हे म्हणणं भाऊसाहेबांनी खोटे ठरविले. आणि उर्दू शायरांच्या मांडीला मांडी लावून भाऊसाहेबांनी आपली मराठी शायरी रसिकांसमोर सादर करण्यास सुरुवात केली. त्यांची मराठी शायरी ऐकण्याकरता उर्दू भाषिकही मोठ्या प्रमाणावर गर्दी करू लागले. असंख्य मराठी रसिकांच्या मनामध्ये भाऊसाहेबांनी जिन्दादिलीची ज्योत पेटवली. कोणताही समारंभ असो, भाऊसाहेबांना शायरीच्या कार्यक्रमांकरता आमंत्रणे येऊ लागली आणि भाऊसाहेबांनी मराठी शायरीला खऱ्या अर्थाने जन्म दिला. त्यांच्या शायरीची पुस्तके निघू लागली आणि हातोहात खपू लागली.*



*मराठी शायरीची निर्मिती करणारे भाऊसाहेब पाटणकर हे मराठी काव्यरसिकांना वेगळ्याच जगात नेऊन धुंद करणारे पहिलेच रचनाकार.*

*विदर्भातल्या यवतमाळसारख्या ठिकाणी राहून पुण्या-मुंबईसारख्या शहरांमध्ये आपले खास रसिकवर्ग निर्माण करून त्यांच्या हृदयात त्यांनी मानाचे स्थान मिळवले.*

*२१ जून १९९९ हा त्यांचा द्वितीय पुण्यतिथी दिवस होता. त्यांच्या शायरीला हे श्रद्धाफूल अर्पण...*



अनुक्रमणिका

त्यांच्या शायरीचे 'दोस्तहो' हे पहिले पुस्तक १९७० च्या सुमारास प्रसिद्ध झाले. या पुस्तकाला प्रस्तावना श्री. के. क्षीरसागर यांनी लिहिली होती. त्याबरोबरच 'मराठी शायरी', 'मराठी मुशायरा' आणि 'जिन्दादिल' ही त्यांची काही शायरीसंपदा.

१९६१ साली त्यांनी पहिल्यांदा शायरी सादर केली. १९७५ मध्ये त्यांनी यवतमाळ येथे पहिले वऱ्हाडी साहित्य संमेलन भरविले. जसा गझल मराठीत आणण्याचा पहिला मान माधव जूलियन यांचा, तसाच मराठी शायरीला प्रतिष्ठा मिळवून दिली ती भाऊसाहेबांनीच !

शेरोशायरी निर्माण करण्यामागची भूमिका मांडताना भाऊसाहेब म्हणत, 'आपल्या मराठी भाषिक समाजाला शेरोशायरी व मुशायरे यांची फारशी कल्पना नाही, तरीही तो उर्दू भाषेच्या गोडव्याबद्दल कित्येकदा छातीठोकपणे सांगत असतो. किंबहुना शेरोशायरी निर्माण करण्याकरता मराठी भाषा तितकीच योग्य आहे; हे आपल्याला माहीत नसतं.'

रसिकांना धुंदावणाऱ्या उर्दू शेरोशायरीची नशा त्यांनी मराठीत आणली. मुशायऱ्यातील बेहोषी काही औरच असते. ती मस्ती मराठीत आणण्यासाठी त्यांनी उर्दू शायरीचा अभ्यास केला. त्यासाठी ते उर्दू शिकले. यातूनच त्यांना शायरीचा आत्मा गवसला.

ढंग उर्दू असला तरी भाऊसाहेबांची शायरी उर्दू संकेतांना, मदिरा, महफिल, मयखाना, साकी, शमा, परवाना आदींना शरण गेली नाही. उलट यज्ञ, वेदी, अर्घ्य, वेदान्त, सगुण-निर्गुण आदी क्षेत्रांत ती बहरत गेली. पण तत्वज्ञानाच्या बोजडपणाचा गंधही त्याला आला नाही. परंतु मिष्कील छटा मात्र येथेही होतीच.

यवतमाळला त्यांचे बरेचशे कार्यक्रम जरी होत असत, तरी पुण्या-मुंबईसारख्या ठिकाणी तेवढ्या प्रमाणात त्यांचे कार्यक्रम व्हायला ७२ साल उजाडले.

त्यावेळी त्यांचा एका खाजगी समारंभात कार्यक्रम ठेवण्यात आला होता. त्यांचे बरेचसे चाहते रसिक त्यावेळी आवर्जून कार्यक्रमाला आले होते. कार्यक्रम संपल्यानंतर त्यांची सही घ्यायला एकच झुंबड उडाली. असंख्य रसिकांनी त्यांना शायरीच्या पुस्तकाबद्दल विचारणा केली. परंतु भाऊसाहेबांकडची सर्व पुस्तके संपली होती. या समारंभात एक रसिक मात्र आगळावेगळा होता. पुस्तक शिल्लक नाही म्हणून तो निराश झाला नाही. भाऊसाहेबांच्या शायरीने त्यांना वेडे केले होते. इतके की त्यांनी भाऊसाहेबांच्या कॅसेटवरून शेर चक्क वहीवर लिहून काढले. त्यानंतर पुढच्या कार्यक्रमात त्यांनी तेच लिहिलेले शेर भाऊसाहेबांना दाखविले व भाऊसाहेबांची शाबासकी मिळविली. भाऊसाहेबांच्या शेरांचा हा आगळावेगळा रसिक म्हणजेच श्री. मधुकर टिल्लू, त्यानंतर त्यांचा आवडता शिष्य झाला.

तेथपासून मात्र भाऊसाहेबांच्या शायरीला पुण्या-मुंबईत खऱ्या अर्थाने गती मिळाली. मधुकर टिल्लू यांचे 'हसायदान' सारखे अनेक सार्वजनिक कार्यक्रम होत असत. त्यामुळे त्यांना मराठी शायरीचा रसिक कोठे आहे याची पुरेपूर कल्पना होती. या माहितीच्या जोरावर त्यांनी भाऊसाहेबांचे कार्यक्रम जागोजागी भरविण्यास सुरुवात केली. सुमारे दीडशे ते दोनशे कार्यक्रम पुण्या-मुंबईत झाले. व भाऊसाहेबांचा रसिकवर्ग वाढू लागला.

साक्षात् मृत्यूवर शायरी लिहूनसुद्धा भाऊसाहेबांनी रसिकांची दाद मिळवली. किंबहुना

*मृत्यूसारख्या भयंकर कल्पनेवर सुद्धा रसिकांना हसायला लावणारं दिव्य काव्य भाऊसाहेबांच्या लेखणीतून ओथंबत होतं. मृत्यूसारख्या दु:खप्राय गोष्टीबाबत आपल्या शायरीतून मांडणी करताना श्रोत्यांच्या तोंडून उत्स्फूर्तपणे 'वाहवा' घेण्याचे कसब भाऊसाहेबच करू जाणे. जीवन, मृत्यू, विनोद अशा तीन मुख्य अंगांवर भाऊसाहेबांची शायरी रसिकांना पागल करीत होती.*

*भाऊसाहेबांच्या बऱ्याच चाहत्यांना त्यांचा ८९ वा वाढदिवस पुण्यात सत्काराच्या रूपाने साजरा व्हावा असे वाटत होते. म्हणून डिसेंबर ९६ मध्ये डी. एस कुलकर्णी फाऊंडेशनतर्फे पुण्याच्या गरवारे कॉलेजमध्ये त्यांचा मोठा सत्कार समारंभ झाला. त्यात जवळजवळ १८ मिनिटे त्यांनी आपल्या शायरीची बरसात पुण्याच्या रसिक प्रेक्षकांसमोर केली. तो त्यांच्या आयुष्यातला पुण्यातील पहिला व शेवटचाच भव्य सत्कार. त्यानंतर मात्र त्यांची प्रकृती खालावली व २१ जून १९९७ मध्ये हा महान जिन्दादिल कायमचा काळाच्या पडद्याआड गेला.*

□

मराठी भाषेत जोम आहे, मराठी प्रतिभा रम्य आहे, मराठी हृदय जिन्दादिल आहे आणि मराठीत शेरोशायरी निर्माण करून मराठी श्रोता सौदर्याचं स्वागत करायला उत्सुक आहे, हे भाऊसाहेबांनी दाखवून दिलं.

शायरी हा उर्दू काव्यप्रकार आहे व मराठीत अशा प्रकारचा काव्यप्रकार होऊच शकत नाही, हे म्हणणे खोटे ठरविणाऱ्या भाऊसाहेबांनी मराठी काव्यक्षेत्रामध्ये मानाचे स्थान पटकावले आहे. मुख्यत: मराठी शायरी ही उर्दूतून आली नसून संस्कृतमधून आली आहे असे सिद्ध करून उर्दूसारखीच मराठी शायरीलासुद्धा भाऊसाहेबांनी समाजामध्ये स्वतंत्र काव्यप्रकार म्हणून मान्यता मिळवून दिली आहे.

मराठी काव्यरसिकांना मराठी शायरी या काव्यप्रकाराचा कधीही कंटाळा येणार नाही याची खबरदारी भाऊसाहेबांनी 'शेर' तयार करताना पुरेपूर घेतली आहे. यातूनच कोणाला कंटाळा आला तर अशा रसिकालासुद्धा भाऊसाहेब शायरीमधूनच कोपरखळ्या मारतात. ते लिहितात,

*'शायरी ऐकून माझी सांगेल, जो आता पुरे ।*
*तो रतीच्या चुंबनाही सांगेल, की आता पुरे ॥*
*तोंडही भगवन्, त्याचे मला दावू नको ।*
*ना जरी मंजूर हे, माझे तया दावू नको ॥'*

त्यांच्या मराठी शायरीमध्ये उर्दू शायरीमध्ये भासणारा लाचार, लोचट, वंचित झालेला, प्रेयसीकडून सतत नाकारला गेलेला शायर अजिबात व्यक्त होत नाही. तसेच लावणीसारखा भडक शृंगारही त्यात नाही.

त्यांच्यातला शायर हा प्रेयसीच्या प्रेमात पडूनसुद्धा आपला स्वाभिमान जपत राहातो. तो

म्हणतो,

*'कुसुमे हासून म्हणतील, ना जरी आम्हास ये ।*
*पाऊल ना टाकू तेथे, बाग ती आमची नव्हे ॥'*

हे सांगत असतानाच त्याला सौंदर्याचा तिरस्कार नाही किंवा तो अरसिकही नाही. परंतु त्याकरता लाचार होणे त्याला पसंत नाही. म्हणून तो म्हणतो,

*'भ्रमरापरी सौदर्यवेडे ऐसे जरी आहो आम्ही ।*
*इष्कातही नाही कोठे भिक्षुकी केली आम्ही ॥*
*खेळलो इष्कात येथे बेधुंद आम्ही खेळलो ।*
*लोळलो मातीत, नाही कुणाच्या पायी आम्ही लोळलो ॥*
*अस्मिता इष्कात साऱ्या केव्हाच नाही विसरलो ।*
*आली तशीही वेळ तेव्हा इष्क आम्ही सारा विसरलो ॥'*

त्यांच्यातला शायर हा पाषाणहृदयीसुद्धा नाही. त्याच्या दगडी मनाला इष्कात पाझरसुद्धा फुटू शकतो.

परंतु तो केव्हा, तर

*'रडलो आम्ही इष्कात जेव्हा आम्हा रडावे वाटले ।*
*तेव्हा नव्हे, इष्कास जेव्हा आम्ही रडावे वाटले ॥'*

प्रेमात पडूनसुद्धा त्यांच्यातला शायर आसूंचा गुलाम झालेला नाही, तर त्याबद्दल तो इतर प्रियकरांना एक आगळावेगळा संदेशही देऊन जातो. तो म्हणतो,

*'आसूवरी अधिकार ज्याला इष्कात साधला ।*
*नुसताच नाही इष्क त्याला, मोक्ष आहे साधला ॥'*

एवढे करूनसुद्धा जर इष्कात सफलता आली नाही तर त्यांच्यातला शायर थोडा हिंसक होतो.

*'बर्बादिची दीक्षा जशी इष्कात आम्ही घेतली ।*
*इष्कही बरबाद करण्या माघार नाही घेतली ॥*
*ना रडू नुसतेच आम्ही, 'हाय' ना नुसतेच करू ।*
*आहो 'शिवा'चे भक्त आम्ही, हेही करू आणि तेही करू ॥'*

. भाऊसाहेबांचे शेर ऐकताना श्रोता इतका तल्लीन होतो की 'वाहवा', 'सुरेख' अशा शब्दांचे टणात्कार जागोजागी होतात. त्यांच्या शायरीचे वैशिष्ट्य म्हणजे प्रेक्षकही हळूहळू त्यात सहभागी होऊ लागतात. खरंतर उर्दू ही शेरोशायरी करण्याकरता एकच भाषा योग्य आहे, असं आपल्याला भाऊसाहेबांचे शेर ऐकेपर्यंत वाटत असतं. 'वाहवा', 'बहोत खूब', 'कमाल कर दिया' असं अधूनमधून म्हणणं म्हणजे शेरोशायरी असं मराठी भाषिकाला वाटत असतं. मराठी माणूस आतापर्यंत भजन-कीर्तनातच दंग होतो, शेरोशायरी ऐकायला लागणारं 'जिन्दा दिल' त्याच्याकडे नाही, अशी एक चुकीची समज समाजात पसरली होती. मात्र उत्स्फूर्तपणे वाहवा देण्याची पद्धत भाऊसाहेबांनी मराठी समाजात रुजवली, हे एक त्यांनी केलेलं समाजकार्यच



अनुक्रमणिका

म्हणावं लागेल.

त्यांचे 'शेर' ऐकणारे श्रोते हे त्यांना कसे हवेत? तर जिन्दा दिल. अशा श्रोत्यांची गरजसुद्धा ते शेरांमधूनच मांडतात,

*'उन्मेष ज्यांच्या यौवनाचा काहीच ना झाला कमी ।*
*प्यायले जे खूप, ज्यांना वाटे परी झाली कमी ॥*
*निर्मिली मी फक्त माझी त्यांच्याचसाठी शायरी ।*
*सांगतो इतरांस बाबा, वाचा सुखे ज्ञानेश्वरी ॥'*

चंद्राच्या सौंदर्यावर भाळून अनेक कवींनी त्याचा विषय हरतऱ्हेने काव्यबद्ध केला आहे. परंतु भाऊसाहेबांनी मात्र चक्क सूर्यावर 'शेर' तयार केला आहे.

ते म्हणतात,

*'भास्करा, येते दया, मजला तुझी आधीमधी ।*
*आहेस का रे पाहिली, तू रात्र प्रणयाची कधी?॥'*

यावरचे सूर्याचे उत्तरसुद्धा भाऊसाहेब शायरीमधूनच मांडतात. सूर्यसुद्धा अतिशय तत्परतेने म्हणतो,

*'आम्हास या शायराची कीव येऊ लागते ।*
*याच्या म्हणे प्रणयास याला रात्र यावी लागते ॥'*

भाऊसाहेबांच्या शायरीचे रंग सौंदर्यछटा सजवायला लागतात. हळूहळू त्यांच्यातला मूळचा कवीसुद्धा त्यांना त्यांच्या निसर्गप्रेमाची आठवण देऊ लागतो. त्यावरोबरच त्यांच्या लेखणीतून बाहेर पडणारे शब्द वेगळाच आस्वाद देऊ पाहतात. आणि त्या धुंद शब्दांचे श्रेय मात्र ते फुलाभोवती गुंजन करणाऱ्या भ्रमरालाच देऊ लागतात. ते कबूल करतात की,

*'ऐसे नव्हे की शायरी या शायरांनी गायली ।*
*कमलासवे भ्रमरादिकांनी आधीच होती गायली ॥*
*पाठ पहिल्या शायरीचे त्यांनीच आम्हा दिले ।*
*फक्त त्यांच्या गुंजनाला शब्द मी माझे दिले ॥'*

सरळ, सोपे, प्रवाही शब्द हा भाऊसाहेबांच्या शेरांचा एक महत्त्वाचा गुणविशेष. तरीपण माझी शायरी म्हणजे भव्यदिव्य असे काहीच नव्हे, असे सांगून आपल्या नम्रपणाची चुणूक ते आपल्या शेरांमधून दाखवितात.

*'सांगेन काही भव्यदिव्य ऐसी शायरी माझी नव्हे ।*
*तो कवींचा मान, तितुकी पायरी माझी नव्हे ॥*
*आम्ही अरे साध्याच आपुल्या जीवना सन्मानितो ।*
*सन्मानितो हासू, तसे आसूही सन्मानितो ॥*
*जाणतो अंती आम्हाला मातीच असते व्हायचे ।*
*नाहीतरी दुनियेत दुसरे काय असते व्हायचे ॥'*

भाऊसाहेबांचा शायर परमेश्वराचं आस्तित्व मान्य करतो, परंतु त्याच्याकडून कोणत्याही

मदतीची अपेक्षा मात्र ठेवीत नाहीत.

*तो सरधोपटपणे सांगून मोकळा होतो. तो म्हणतो,*

*'मानतो देवास, ना मानतो ऐसे नव्हे ।*
*मानतो इतुकेच की तो आमुचा कोणी नव्हे ॥'*

तो इतका धुंद आहे, की इतरांना त्याच्या धुंदीची जणू सवयच होऊन जाईल. व तो खरोखरीच मेला तरी लोकांना वाटेल, अरे, हा तर धुंदीत आहे, मेलेला नाही. त्यावेळी त्यांच्यातल्या शायराला आपल्या धुंदीचा अभिमान वाटायला लागतो. तो खुष होऊ म्हणतो,

*'आहो असे बेधुंद, आमची धुंदही साधी नव्हे ।*
*मेलो तरी वाटेल, मेला दुसरा कोणी, आम्ही नव्हे ॥'*

पण या शायरी काव्याला दर्जाही प्राप्त झाला पाहिजे, अशीही त्यांची इच्छा आहे. तेव्हा,

*'सन्मानिले वैराग्य, आम्ही शृंगारही सन्मानिला ।*
*अंकावरी आहे रतीच्या बुद्ध येथे झोपला ॥'*

आता काही कंजुष लोक विचारतील, की 'काय हो भाऊसाहेब, या तुमच्या शायरीला किती खर्च आला?'

त्यावर भाऊसाहेब स्वाभिमानाने म्हणतात,

*'दोस्तहो, आम्ही स्वये हा ताज उभारला ।*
*नाही आम्ही दुसऱ्या कुणाच्या श्रमाने उभारला ॥*
*सौंदर्य तर त्याहूनही जास्त साधता आले आम्हा ।*
*मोजकी याचा खर्च ना आला आम्हा ॥*
*आसवे नयनात जर या निर्मिली नसती कुणी ॥*
*ज्यांनी दिला हा दर्द ।*
*मी नव्हे ही शायरी त्यांनीच आहे निर्मिली ॥'*

भाऊसाहेब आपल्या दीर्घायुष्याचे रहस्य सांगताना इतर काही वृद्धांसारखे खोटे नाही बोलत की, 'माझ्या दीर्घायुष्याचे रहस्य, माफक आहार, नियमित व्यायाम...' वगैरे.

मात्र भाऊसाहेब म्हणतात,

*'शब्दही या पौरुषाचा बोललो नाही कधी ।*
*जगलो ऐसा गुपचाप जैसा जन्मलो नव्हतो कधी ॥*
*दीर्घायुष्याचे मर्म माझ्या समजणे सोपे नव्हे ।*
*मृत्यूसही वाटेल याला हातही लावू नये ॥'*

दुसऱ्या एका ठिकाणी ते म्हणतात,

*'म्हणती मला शाबास साऱ्या विषयास तुम्ही सोडले ।*
*मी तरी सांगू कशाला कोणी कुणाला सोडले ॥*
*ओळखही या संयमाची माझी तरी नव्हती कधी ॥*
*दोस्तहो, कीर्ती अशी फुकटातही मिळते कधी ॥'*

कोणीतरी भाऊसाहेबांना म्हटले, नव्या पिढीवर शायरी करून दाखवा पाहू. तेव्हा भाऊसाहेब त्यांच्यावद्दल लिहितात,

*'केसास देतो वेव्हज्, आम्ही फेसपावडर लावतो ।*
*घालती बुशकोट जैसा ब्लाऊज, आम्ही घालतो ॥*
*मर्द पण आम्हा म्हणाया, शंका नका घेऊ कधी ।*
*सांगतो शपथेवरी बाळंत ना झालो कधी ॥'*

कोणीतरी त्यांना म्हणतो, 'भाऊसाहेव, वस झाली आता शायरी वगैरे. आता जरा देवधर्माकडे लक्ष द्या. तेवढेच म्हातारपणी पुण्य जमा कराल.' त्यावर ते आपल्या शेरांचा घणाघाती घाव त्या माणसांच्या डोक्यात घालतात,

*'जातो तिथे उपदेश आम्हा सांगे कोणीतरी ।*
*मनाचे श्लोक वाचा आणि ऐका जरा ज्ञानेश्वरी ॥'*

तेव्हा मी त्यांना काय म्हणतो, ऐकायचेय?

*'काळजी आमच्या हिताची एवढी वाहू नका ।*
*जातो सुखे नर्कात, तेथे तरी येऊ नका ॥*
*वाटे धरू सन्मार्ग, आता काळ थोडा राहिला ।*
*वाटे कशाला व्यर्थ, आता काळ थोडा राहिला ॥*
*ठरविले नक्कीच आता, व्हायचे नापास मी ।*
*मिळवूनही काय करू आता, नुसते हस्ताक्षराचे मार्क मी ॥'*

**जीवन**

माणसाचं हृदय हे भावभावनांचं अधिष्ठान आहे. परमेश्वरानं आम्हाला हृदय दिलं व आम्ही सौंदर्यासक्त झालो. पण परमेश्वरानं आम्हाला विषयासक्त म्हणून लेबल लावलं. त्यावद्दल भावनेनं ओथंबलेले शब्द भाऊसाहेबांच्या मुखातून बाहेर पडतात.

*'भगवन्, अरे नुसते कुठे तू काळीज आमचे निर्मिले ।*
*आहे तुझ्या दुनियेत साऱ्या, सौंदर्य आम्ही निर्मिले ॥*
*ना तरी सारेच असते पाषाण हे सगळीकडे ।*
*श्वापदे असतो आम्ही, असतो जसे मुंग्याकिडे ॥*
*बदला परी प्रभो, काय तू आम्हा दिला?।*
*आम्ही उबविला स्वर्ग आणि नर्क तू आम्हा दिला ।*
*पाहूनी याला जरी ओशाळला नसतास तू ।*
*लपलासही नसतास ऐसा निर्गुणाच्या आड तू ॥*
*केली क्षमा आम्हीच, आम्हा हेही करावे लागते ।*
*करण्या क्षमा दुसऱ्यास भगवन्, अरे माणूस व्हावे लागते ॥*

*आलो तुझ्या दुनियेत नव्हतो चोर वा डाकू आम्ही ।*
*एकही चीज येथली घेऊन ना गेलो आम्ही ॥*
*तेही असो, आमच्यासवे ज्याला आणिला येथे ।*
*भगवन्, अरे हा देहही आम्ही सोडून गेलो इथे ॥*
*नुसतेच ना दुनियेत तुमच्या आलो आम्ही गेलो आम्ही ।*
*भगवन्, अरे दुनियेस तुमच्या काही देऊनी गेलो आम्ही ॥*
*शायरी अर्पून गेलो, माझी जणू सर्वस्व ती ।*
*दुनिया तुला विसरेन, ना आम्हा विसरेन ती ॥'*

तरुणपण सरतं आणि प्रौढपणाची चाहूल लागते. प्रत्येकजण मग स्वत:च्या म्हातारपणाची तरतूद करायला लागतो. कुणी घर बांधतं, कुणी बचत करतं, कुणी बँकेत कायमस्वरूपी रक्कम टाकून व्याज घेतो. पण भाऊसाहेबांमधल्या शायराने आपल्या म्हातारपणाची वेगळीच तरतूद केली आहे. त्यांची आसवं हीच त्यांची जीवनातली खरीखुरी बचत आहे. आपल्या शब्दांमधून भारून टाकणारे विचार, जीवनातलं एक प्रखर सत्य भाऊसाहेब स्पष्टपणे आपल्या लेखणीतून मांडतात.

*'होता असाही काळ, सारे नम्र होते मजपुढे ।*
*झेलण्याला शब्द माझा, होते उभे मागेपुढे ॥*
*आता कुठे तो काळ, त्याची खूणही ना राहिली ।*
*आसवं माझीच माझ्या, काबूत ना राहिली ॥*
*आसवं इतक्याच साठी, नव्हती कधी मी गाळली ।*
*गाळावयाची होती अशी, की नसतील कुणी गाळली ॥*
*आसवांच्या या धनाला, सांगून मी सांभाळले ।*
*आज या वृद्धापकाळी, त्यांनी मला सांभाळले ॥*
*वाटले नव्हते कधी, हा काळ आहे यायचा ।*
*संपेल हे उद्यान आणि सहारा आहे यायचा ॥*
*याही स्थळी रेतीत आम्ही फुलबाग आहे लावली ।*
*इतकेच की मी आज येथे आहे अबोली लावली ॥*
*गंधही आहे येथे, आहे अबोली जरी ।*
*आहे स्मृतीचा गंध येथे, त्यांना जरी नसला तरी ॥*
*रिझवण्या आम्हास, आहे येथे कोणी सोबती? ।*
*सोबती आहेत आसू आणि गतकाल आहे सोबती ॥'*

### विनोद

भाऊसाहेबांनी आपल्या शायरीत विनोदाला मानाचे स्थान दिले आहे. उर्दू शायरीमध्ये विनोद चुकूनसुद्धा सापडत नाही. याचं कारण असं की उर्दू शायरी हा राजदरबारी काव्यप्रकार होता. राजदरबारातलं वातावरण हे अतिशय गंभीर असं असायचं. त्या वातावरणाला अनुसरून

उर्दू शेरसुद्धा गंभीर प्रकृतीचेच असायचे. पण अर्थातच भाऊसाहेबांना तसं बंधन नसल्यामुळे त्यांनी विनोदाची आपल्या शेरांमधून मुक्त उधळण केली आहे. शेर हा वाचकांनीसुद्धा वाहवा देण्यास लायक असू शकतो, हे भाऊसाहेबांनीच प्रथम समाजाला दाखवून दिलं.

भाऊसाहेबांचे शेर ऐकताना अगर वाचताना एक गोष्ट प्रकर्षाने लक्षात येते. ती म्हणजे, भाऊसाहेबांनी यमक किंवा ताल आपल्या शायरीतून पद्धतशीरपणे आणि सराईतपणे तोलून धरला आहे. त्यांच्या पहिल्या आणि दुसऱ्या ओळीतला प्रत्येकी शेवटचा शब्द हा एकच असतो. अर्थात विनोदाची शायरी लिहिताना त्यांनी क्वचितच थोडा मुक्तपणा घेतला आहे.

कोजागिरी पौर्णिमेवर ते लिहितात,

*'चंद्रमा हासे नभी, शांत शीतल चांदणे ।*
*आमच्या आहे कपाळी, अमृतांजन लावणे ॥*
*लावण्या हेही कपाळी, नसतो तसा नाराज मी ।*
*परी आहे कपाळी, आपल्याच हाती लावणे ॥'*

वरील शेरामध्ये गमतीचा भाग म्हणजे 'कपाळ' ह्या शब्दाचा दुहेरी उपयोग मोठ्या खुमासदार पद्धतीने भाऊसाहेबांनी केला आहे.

असाच अजून एक सुंदर शेर —

*'तिरप्या तिच्या नजरेवरी बेहद्द झालो खुश मी ।*
*आज पण कळले मला ती ऐसीच बघते नेहमी ॥'*

भगवत्गीतेतल्या श्रीकृष्णाच्या एका प्रसिद्ध उपदेशावर ते लिहितात,

*'सांगती निष्काम कर्म करण्यास, कृष्णा अरे वेदांत तू ।*
*समजलास की काय आम्हाला किर्लोस्करांचा पंप तू ॥*
*निष्कामता थोडी जरी अंगी असती तुझ्या ।*
*धावून या साऱ्याच येत्या आमच्याकडे गोपी तुझ्या ॥'*

### प्रणयातला विनोद

स्त्री-पुरुष प्रेम म्हटले की प्रणय आलाच. भाऊसाहेबांनी मात्र प्रणयालासुद्धा तितकेसे गंभीरपणे घेतलेले नाही. प्रियकर-प्रेयसीमधला प्रणय त्यांनी विनोद या माध्यमाद्वारे इतका प्रगल्भपणे सादर केला आहे, की श्रोत्यांना हसवता हसवताच त्यांच्या हृदयावर मोरपंखी पीस हळूवारपणे फिरवण्यात ते कमालीचे यशस्वी झाले आहेत. त्यांच्या शायरीमधील प्रियकर-प्रेयसीचा संवाद मोठा रंजकपणे श्रोत्यांसमोर रूंजी घालत असतो.

प्रियकर म्हणतो,

*'भीती तिजला प्रणयात कोणी पाहील याची वाटते ।*
*येऊनही स्वप्नात माझ्या हेच तिजला वाटते ॥*
*म्हणते कशी, कैसीतरी स्वप्नात या आले तुझ्या ।*
*आहेच पण सारे बाई भोवती जागे तुझ्या ॥*
*जाणते सर्वांस यांना, मीही नसे साधी तशी ।*

*'स्वप्नातही येतील मेले मी जशी आले तशी ॥'*

प्रियकरच पुढे म्हणतो,

*'भेटण्या जेव्हा तिच्या स्वप्नात मी गेलो.तेव्हा ।*
*हाय ती आपल्या स्वतःच्याच स्वप्नात नव्हती तेथे ॥*
*त्रास ऐशा अप्सरेला हाच असतो सारखा ।*
*नेतो तिला उचलून तो तो आपल्याच स्वप्नी सारखा ॥*
*ऐकिले दुसऱ्या कुणाच्या स्वप्नात ती आहे तेथे ।*
*बोलावले नव्हते तरी मी धावून गेलो तिथे ॥*
*वाटले की दुर्दैव आता नक्कीच माझे संपले ।*
*पोचण्याआधीच त्याचे स्वप्न होते भंगले ॥'*

## मृत्यू

मृत्यूची शायरी सुरू होण्यापूर्वी भाऊसाहेब श्रोत्यांना त्यांच्याकडून वाहवा घेण्याची हमी देत असत. त्यांची शायरी वाचताना वाचकांच्या तोंडातूनही वाहवा नाही निघाली तर नवलच.

काही असामान्य माणसे मोक्ष मिळविण्याकरता जीवाचं रान करत असतात. त्यांना कुठल्याही परिस्थितीत मोक्ष हवा असतो. पण भाऊसाहेबांचा शायर हा एक सर्वसामान्य मनुष्य आहे. मोक्षाच्या वाटा त्याला पूर्णपणे बंद आहेत.

पण तो मृत्यूपेक्षा मोक्षालाच भितो. तो म्हणतो,

*'ना भितो मृत्यूस जैसा भितो मोक्षास मी ।*
*समजा, कंटाळलो तिथे, तर काय मग करणार मी? ॥'*

तो पुढे म्हणतो,

*'दोस्तहो, दुनियेस धोका मेल्यावरी आम्ही दिला ।*
*येऊनही नर्कात पत्ता कैलासचा आम्ही दिला ॥*
*हाय, हे वास्तव्य माझे सर्वांस कळले शेवटी ।*
*सारे हे सन्मित्र माझे तेथेच आले शेवटी ॥*
*मृत्यूची माझ्या वदंता सर्वत्र जेव्हा पसरली ।*
*घबराट इतुकी नर्कलोकी केव्हाच नव्हती पसरली ॥*
*प्रार्थूनी देवास म्हणती सारे आम्हाला वाचवा ।*
*वाचवूनी नर्कास पावित्र्य येथले वाचवा ॥'*

स्वर्गात गेल्यावर काय होईल, याचे चित्रणही भाऊसाहेबांनी श्रोत्यांच्या पुढ्यात मांडले आहे. इंद्राला उद्देशून भाऊसाहेब म्हणतात,

*'इंद्रा, अरे सांगू नको त्या रंभा आणि उर्वशा ।*
*कुणा हव्या विसळून तुमच्या त्या चहाच्या कपबशा ॥*
*कल्पवृक्षाच्या तुझी ना आम्हा मातब्बरी ।*
*त्याहूनही आमच्या अरे कुंपणाची मेंदी बरी ॥*



अनुक्रमणिका

*त्यांनाच ने स्वर्गात, ज्यांनी त्रास येथे भोगला।*
*राहूनही नुसत्या संयमाने वनवास येथे भोगला॥*
*आम्हा कशाला स्वर्ग, आम्हा काहीच ना येथे कमी।*
*आहे थोडे जास्तीच येथे, स्वर्गात आहे जे कमी॥*
*आसवे आहेत येथे, दर्दही आहे येथे, आम्ही याला मानतो।*
*साफल्य साऱ्या जीवनाचे अश्रूत आम्ही मानतो॥'*

मृत्यूपुढे सुद्धा आपल्या शायरीमधून भाऊसाहेब आगळीच आव्हाने उभी करतात.

*'ऐसे नव्हे मृत्यूस आम्ही केव्हाच नाही पाहिले।*
*पाहिले आहे खूप त्यास प्रत्येक जन्मी पाहिले॥*
*मारिले आहे आम्हीही मृत्यूस प्रत्येकदा।*
*नुसतेच ना मेलो आम्ही, जन्मलो प्रत्येकदा॥*
*मृत्यो, येतांस जरका थोडा आधी तरी।*
*ऐकून जातास तूही शेर एखादा तरी॥*
*एकही नाही कला तू मानवाची पाहिली।*
*जेथे जेथे गेलास तेथे राख नुसती पाहिली॥'*

मृत्यूला उपदेश करण्याचं धाडस करणारे भाऊसाहेब हे नुसते पहिले शायरच नव्हे तर पहिलाच मानव असावा. ते मृत्यूला सांगतात,

*'तू तरी या अप्सरांच्या नादी असा लागू नको।*
*सांगूच का मृत्यो का असं म्हणतो 'नको'॥*
*दुर्दशा आमच्यापरी ऐसी जरी आली तुझ्या।*
*कुठवरी रडशील वेड्या अरे मरणही नाही तुला॥'*

मृत्यूनंतर जर पुन्हा पृथ्वीवर यायला मिळाले तरीही भाऊसाहेब शायरी करणे चालू ठेवतील हे त्यांच्या खालील शेरामधून प्रतीत होते. ते जेव्हा पृथ्वीला पुन्हा भेट देतील, तेव्हा त्यांचा एक फोटो येथे लावला असेल. पण त्या फोटोवर वरीचशी धूळ साचलेली असेल. त्या फोटोला घातलेला हार वाळून गेला असेल.

व त्यानंतर भाऊसाहेबांची शायरी पृथ्वीवरील एका कटू सत्याला हात घालेल. त्यांच्या अमोघ शायरीचे बोल आपल्याला खरोखरच अंतर्मुख व्हायला लावतात. भाऊसाहेबांच्या लेखणीच्या अश्रूंचा श्रोत्यांच्या चरणावर पडलेला एक अमोल थेंब त्यांच्यातल्या व्यथेला बोलका करतो. तो आवाज देतो श्रोत्यांच्या अंत:वेदनेला... व इथे ते श्रोत्यांना फसवू शकत नाहीत. त्यांची व्यथा इथे नेहमीसारखी क्षीण होत नाही.

*'होती तेथे तस्वीर माझी भिंतीवरी त्या टांगली।*
*खूप होती धूळ आणि कसर होती लागली।*
*बोलली तस्वीर माझी मला, हे का तुला सांगावे लागते?।*
*मेल्यावरी जगण्यास वेड्या, खूप कीर्ती लागते॥'*

*'होऊनी स्वार्थांध नुसता, कैसातरी जगलास तू ।*
*आहेस का केला कुठे, जगण्याविना पुरुषार्थ तू ॥*
*आता तरी समजली ना आपली स्वत:ची पायरी? ।*
*समजले ना काय मिळते नुसती करूनि शायरी?॥'*

खरंच काही मिळालं का भाऊसाहेबांना शायरी करून? मिळालं. नक्की मिळालं. मिळालं ते मराठी काव्यरसिकांचं उदंड प्रेम. आणि भाऊसाहेबांसारख्या एका सच्चा कलाकाराला दुसरं काय हवं असतं?

मराठी काव्यरसिकांना शायरीची कधीही न संपणारी शिदोरी भाऊसाहेब ठेवून गेले आहेत. कोणत्याही रसिकाला आपली दु:खं विसरायला भाग पाडणारी कला जो कलाकार सादर करतो, तो कलाकार हमखास यशस्वी होतो. रसिकांना आपलं दु:खच काय पण आपला धर्म व आपले वय विसरायला लावणाऱ्या भाऊसाहेबांना अहंकाराचा स्पर्श चुकूनसुद्धा कधी झाला नाही, हे त्यांचे एक आगळेवेगळे वैशिष्ट्य काव्यरसिकाला कायम आपुलकीच्या बंधनात अडकवून ठेवण्यास पुरेसं होतं.

असा हा उच्च लेखणीचा शायर भविष्यात होणे नाही, हे कटू सत्य आपल्याला वेडावतं आणि भाऊसाहेबांच्या लेखणीची आठवण मनात घोळवत ठेवतं.

□

*भाऊसाहेबांची शायरीसंपदा :*
*'दोस्तहो!', 'मराठी मुशायरा', 'मराठी शायरी', 'जिन्दा दिल', 'मैफिल',*

□

सदानंद देशपांडे
२४, ईशदान सोसायटी, पौड रोड, कोथरूड, पुणे २९.

**नगर वाचन मंदिराचे तीन ग्रंथपुरस्कार**

पुणे नगर वाचन मंदिरातर्फे दरवर्षी प्रत्येकी एक हजार रु.चे तीन ग्रंथपुरस्कार देण्यात येतात. यंदाचे पुरस्कार १९९९ मधील (१ जानेवारी ते १५ डिसेंबर) ग्रंथांना देण्यात येणार आहेत.

१३ जानेवारी - कै. श्री. ज. जोशी पुरस्कार, उत्कृष्ट कथासंग्रहास.

७ फेब्रुवारी कै. कवी ह. स. गोखले पुरस्कार, संतवाङ्मय विषयक ग्रंथास.

६ मार्च - कै. प्रा. श्री. ना. बनहट्टी ग्रंथपुरस्कार, ललितेतर वैचारिक स्वरूपाच्या ग्रंथास.

ज्या प्रकाशकांना अथवा ग्रंथकारांना या पुरस्कारासाठी पुस्तकाच्या प्रती पाठवायच्या असतील त्यांनी दोन प्रती 'कार्यवाह, पुणे नगर वाचन मंदिर, बेलबागेसमोर, लक्ष्मीरोड, पुणे - ४११ ००२' या पत्त्यावर पाठवाव्यात ही विनंती.

पुष्पा लिमये, कार्यवाह

# शिक्षक-पत्रकारांच्या शिक्षणविषयक विचारांचा सखोल मागोवा

विजय देव

'पत्रकारांचा शिक्षणविचार' हे डॉ. न. म. जोशी यांचे त्यांच्याच पीएच्. डी.साठी लिहिलेल्या प्रबंधावर आधारित असलेले पुस्तक आहे. त्यांच्या प्रबंधाचा विषय होता, '१९५० पूर्व मराठी निबंध वाङ्मयातील शिक्षणविचाराचा चिकित्सक अभ्यास'. अर्थातच प्रबंधाची व्याप्ती आणि प्रस्तुत पुस्तकाची व्याप्ती यांत बराच फरक आहे.

प्रस्तुत पुस्तकात १९५० पूर्वीच्या सात मराठी शिक्षक : लोकशिक्षक : लेखक-संपादक यांचे शिक्षणविषयक विचार ग्रथित केले आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, गोपाळराव आगरकर, शि. म. परांजपे, अच्युत बळवंत कोल्हटकर, न. चिं. केळकर आणि वा. म. जोशी हे ते शिक्षणविषयक विचार करणारे सात विचारवंत.

भारतात आधुनिक शिक्षणाची सोय आणि व्यवस्था ब्रिटिशांनी सुरू केली. राजा राममोहन रॉय यासारख्या उदारमतवादी विचारवंतांनी तिचं स्वागत केलं. तिला चालना दिली. त्या उपक्रमाला आता दोनशेवर वर्षे होत आली. बंगाल आणि मुंबई प्रांत पाश्चात्त्य पद्धतीच्या शिक्षणात संपूर्ण देशात पुढे होते.

एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकातील सुशिक्षितांच्या पिढ्यातील जाणकारांना शिक्षणक्षेत्राकडे वळावेसे वाटले होते. 'जे जे आपणांसी ठावे ते ते इतरांशी सांगावे, शहाणे करुनि सोडावे सकल जन.' या न्यायाने त्यांनी काम केले. 'व्यक्ति, समाज, राष्ट्र व मानवता यांच्या जडणघडणीच्या कार्यशाळा म्हणजे शिक्षणसंस्था आणि त्या उद्दिष्टांची पूर्तता करणाऱ्या मार्गदर्शक विद्वान व्यक्ती म्हणजे शिक्षक.' हे सूत्र घेऊन न. म. जोशी यांनी या शिक्षक-पत्रकारांच्या शिक्षणविषयक कार्याकडे पाहिले आहे. आजही आपण शिक्षण हे व्यक्ती आणि समाजाच्या सर्वांगीण विकासाचे साधन आहे, असे मानतो. समाजपरिवर्तनासाठी शिक्षण यावर आपली अद्यापि श्रद्धा आहे.

डॉ. न. म. जोशी यांची अशी धारणा आहे, की या सात निवडक शिक्षक पत्रकारांनी आपल्या अध्ययन, अध्यापन आणि लेखनातून एकोणीस आणि विसाव्या शतकात महाराष्ट्रात शिक्षणविषयक विचारांचा पाया घातला. अध्यापनातून सुशिक्षितांच्या पुढील पिढ्या निर्माण केल्या, पत्रकारितेतून लोकशिक्षणाचा प्रसार केला. त्यांनी शाळा काढल्या, विद्यालये, महाविद्यालये, स्थापन केली. दैनिके, साप्ताहिके, मासिके काढली. लेखनासाठी त्यांनी 'निबंध' हा साहित्यप्रकार वापरला. त्यातून सामाजिक, राजकीय, आर्थिक, धार्मिक तसेच शिक्षणविषयक विचार मांडले. संस्कृतीची आठ अंगे हे त्यांचे निबंधविषय असत. धर्म, राजकारण, अर्थकारण, समाजकारण, विज्ञान, कला, साहित्य व शिक्षण ही ती समाज-संस्कृतीची आठ अंगे. त्यात



अनुक्रमणिका

अद्यापि फारसा फरक न पडल्यामुळे त्यांचे निबंध आजही उपयुक्त आणि विचार करण्याजोगे आहेत.

विष्णुशास्त्री चिपळूणकर हे मराठीतील आद्य निबंधकार. त्यांच्या निबंधमालेत राष्ट्रीय वृत्ती आणि राष्ट्रीय शिक्षणाचा मूलगामी विचार होता. लोकमान्य टिळक आणि गोपाळराव आगरकर हे शास्त्रीबोवांचे शिष्य. शास्त्रीबोवांच्या प्रेरणेने आणि मार्गदर्शनाने त्यांनी राष्ट्रीय शिक्षणाचे मोठे कार्य केले. शिक्षण पाश्चात्य पद्धतीचे असावे की पौर्वात्य पद्धतीचे यावर वाद घालून, चर्चा करून त्यांनी राष्ट्रीय शिक्षणात पाश्चात्त्य अणि पौर्वात्य शिक्षणाचा समन्वय घातला. विष्णुशास्त्री इंग्रजीला 'वाघिणीचे दूध' म्हणत. ते पचवून नवी विद्या आणि नवे ज्ञानविज्ञान आत्मसात करून नव्या भारताची उभारणी करण्याची त्यांची योजना होती.

औपचारिक राष्ट्रीय शिक्षणाबरोबर त्यांनी अनौपचारिक लोकशिक्षणालाही तितकेच महत्त्व दिले. औपचारिक शिक्षणासाठी जशी शाळा-कॉलेजे काढली तशी लोकशिक्षणासाठी वर्तमानपत्रे. वृत्तपत्रातील त्यांचे संपादकीय लेखन वैचारिक निबंधांसारखे असे. व्यक्ती आणि समाजाशी संबंधित असलेला कोणताही विषय त्यांच्या निबंधात्मक लेखनाला वर्ज्य नसे. ते तिघेही तळमळीचे शिक्षक, खंदे पत्रकार, राष्ट्रीय वृत्तीचे विद्वान होते. त्यांनी सामाजिक, राजकीय, आर्थिक स्वरूपाचे विपुल लेखन केले. समाज, धर्म आणि संस्कृतीचा सखोल विचार केला. इंग्रजी राजवटीच्या फायद्या-तोट्याचा जमा-खर्च मांडला. त्यांच्यात मतभेद होते; परंतु त्यांच्या राष्ट्रीय चरित्र्याविषयी संशय नव्हता.

शिवरामपंत परांजपे आणि नरसिंह चिंतामण केळकर हे टिळक-आगरकर यांच्या थोड्या नंतरचे निबंधकार, पत्रकार आणि लोकशिक्षक. विद्वत्ता, कवित्व, शैली आणि राष्ट्रप्रेम यांचा सुरेख संगम त्यांच्या लेखनात आढळतो. स्वातंत्र्याची आंतरिक तळमळ, देशभक्ती, स्वदेशाभिमान या बाबतीत ते कमी नव्हते. किंबहुना या गुणांमुळेच त्यांचे लेखन तेजस्वी बनले. भारताच्या सामाजिक, राजकीय आणि आर्थिक दुरावस्थेला शिक्षणाचा अभाव हेच कारण होते. पाश्चात्त्य इंग्रजी शिक्षणामुळे ती दुरावस्था कमी होण्याऐवजी वाढत असल्याचा दावा त्यांनी केला. परपुष्टता आणि दास्य यांची त्यांना मनस्वी चीड होती.

न. चिं. केळकर हे संपादक, वक्ते, निबंधकार, सामाजिक कार्यकर्ते, विचारवंत या सर्व दृष्टींनी श्रेष्ठ आणि प्रसिद्ध होते. ते स्वभावत: रसिक, विनोदी, व्यासंगी होते. स्त्री-शिक्षण, कृषि-शिक्षण, देशी भाषांतून शिक्षण, राष्ट्रीय शिक्षण, शिक्षक-विद्यार्थी संबंध, शिक्षक-शिक्षणाचे प्रश्न, पाश्चात्त्य शिक्षण, मागासवर्गीयांचे शिक्षण, परीक्षापद्धती, ग्रंथ-ग्रंथालये, सक्तीचे शिक्षण, शिक्षणाची अर्थव्यवस्था, शिक्षण आणि राजकारण, चारित्र्यसंवर्धन, बुद्धिनि:सारण.... अशा अनेकानेक विषयांचा केळकरांच्या लेखनात अंतर्भाव असे. लोकसंख्या, पर्यावरण, कुटुंबनियोजन हे आजही महत्त्वाचे असलेले विषय त्यांनी शास्त्रशुद्धरीत्या हाताळले.

अच्युत बळवंत कोल्हटकर आणि वामन मल्हार जोशी हे शिक्षक, प्राध्यापक, लेखक, संपादक आणि पत्रकार. त्यांची ध्येयनिष्ठा, चिंतनशीलता, विचारप्रवर्तकता, पराकाष्ठेचा प्रामाणिकपणा, मानसशास्त्र, नीतिशास्त्र, गांधी-शिकवण, स्त्री-शिक्षण विषयीची तळमळ त्यांच्या

निबंधात्मक लेखनात दिसून येते.

पत्रकारांच्या शिक्षणविषयक विचारांचा मागोवा घेत घेत लेखकाने त्यांचे विश्लेषण केले आहे. मुळात संशोधन-प्रबंधाचा विषय असल्यामुळे अभ्यासपद्धतीला महत्त्व दिले गेले आहेच. प्रबंधासाठी कराव्या लागणाऱ्या संशोधनाला अभ्यासपद्धतीची आवश्यकता असते. परंतु प्रबंधावर आधारित पुस्तकही प्रबंधाच्या पद्धतीनेच लिहिले तर ते वाचनीय ठरण्यात काही अडथळे येऊ शकतात. 'पत्रकारांचा शिक्षण विचार' या विषयावर डॉ. न. म. जोशी यांनी एक प्रदीर्घ प्रबंध लिहिण्यापेक्षा एक प्रदीर्घ निबंध लिहिला असता तर सामान्य वाचकांना, की जे शिक्षणविषयक क्षेत्रात आणि शिक्षणविषयक प्रश्नात रस घेतात, त्यांना तो अधिक वाचनीय ठरला असता.

प्रस्तुत पुस्तक शिक्षक, वृत्तपत्रकार, संपादक, लेखक, शिक्षण संस्थाचालक यांनी जरूर वाचले पाहिजे. परंतु महाराष्ट्रातील असंख्य सुशिक्षित पालकांनी तर अवश्य वाचायला हवे. शिक्षणाच्या प्रसाराला सुरुवात होऊन दीड-दोनशे वर्षे झाली तरी अजूनही आपण ब्रिटिश स्थापित शिक्षणपद्धती आणि शिक्षणव्यवस्था बदलू शकलो नाही. शिवाय जी प्रचलित आहे, तिला दोष मात्र देत राहिलो. महाराष्ट्रात पुस्तकात समाविष्ट केलेल्या सर्वच शिक्षक-पत्रकारांनी या ना त्या स्वरूपात राष्ट्रीय शिक्षणाचा पुरस्कार केला असला तरी अद्यापि याविषयी स्पष्ट विचार आणि धोरण आस्तित्त्वात आले नाही. शिक्षणामुळे व्यक्ती आणि समाजाच्या जीवनात अपेक्षित परिवर्तन घडून येते हे सूत्र आजही महत्त्वाचे मानले जाते. परंतु, विद्यमान परिस्थितीतील भ्रष्टाचारी, स्मगलर्स, आतंकवादी, दहशतवादी आणि अन्य समाजकंटक पाहिले तर ते अशिक्षित किंवा निरक्षर नसतात हे दिसते. तसेच ते आपल्या शिक्षणाचाच उपयोग करताना दिसतात !

आधुनिक शिक्षक आणि लोकशिक्षक म्हणजे पत्रकार यांची संख्या लक्षणीय वाढली आहे, परंतु त्यांच्या हातून शिक्षण वा लोकशिक्षणाचे कार्य कसे आणि कितपत होते आहे, याचा गंभीरपणे विचार करून काही ठरविता येण्यासाठी डॉ. जोशी यांच्या पत्रकारांच्या शिक्षणविचारांचा फार मोठा उपयोग होणे शक्य आहे. अर्थातच् हे पुस्तक लिहून आपले शिक्षणविषयक संशोधन डॉ. जोशी यांनी प्रकाशात आणल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करायला हवे.

*'पत्रकारांचा शिक्षणविचार', लेखक : डॉ. न. म. जोशी*
*प्रकाशक : सुविद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे : २६४, किंमत : रु. २००/-*

□

*डॉ. विजय देव*
*'मानसी', तुळशीबागवाले कॉलनी, पर्वती, पुणे ४११ ००९.*



अनुक्रमणिका





## स्वागत

- **असे वृक्ष असे देव :** शा. प्र. दीक्षित, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०८
- **पाणी तपासणी व मोजमाप :** डॉ. बी. पी. कांगीकर, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६८
- **रासायनिक खते :** जयवंत डोंगळे, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २६२
- **भुताचा भाऊ :** सुरेश सावंत, इसाप प्रकाशन, नांदेड, पृष्ठे ३२
- **व्याकरण शुद्धलेखन प्रणाली :** सत्त्वशीला सावंत, गोकुळ मासिक प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९४
- **मारवा :** कुसुमाग्रज, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ९४
- **मोरपिस :** सौ. भावना गोखले-बेडेकर, ऋचा प्रकाशन, नागपूर, पृष्ठे १२४
- **युद्ध सुरू आहे :** शशिकांत हिंगोलेकर, अस्मिता प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ११२
- **वसंतमोहोर :** सौ. सुधा जोशी, अक्षर प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ४८
- **चित्तबोध :** सौ. सुधा जोशी, अक्षर प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ३०
- **स्टँप कलेक्शन :** दिवाकर बापट, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ६४
- **खेळ-खेळाडू :** डॉ. इरेश स्वामी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २५
- **शाळेला सुट्टी :** डॉ. इरेश स्वामी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ३६
- **घरगुती सामानाची निगा :** शंभुनाथ कहोळकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९५
- **मराठी बालसाहित्य :** विश्वास वसेकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १११
- **कष्टाची भाकर :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- **अंधार दूर झाला :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- **सोन्याचे हात :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- **पाणी :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- **लपलेलं संकट :** बाबा भांड, साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६
- **फोटोवर टिच्चून :** शकुंतला फडणीस, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे ११७
- **मला उमगलेले ज्ञानेश्वर :** उर्मिला देशपांडे, भंडारी मुद्रणालय, पुणे, पृष्ठे ७२
- **प्रहार :** अरुण काळे, श्रेयस प्रकाशन, सातारा, पृष्ठे १०६
- **पाझर :** शं. क. कापडनीस, सौ. कापडनीस, नाशिक, पृष्ठे ५६
- **गुलामगिरी :** संपादक - वासुदेव मुलाटे, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ९२
- **अक्षर भाकिते :** केशव मेश्राम, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १७६
- **काळोखवेणा :** वासुदेव मुलाटे, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १३१
- **शेतकऱ्यांचा आसूड :** वासुदेव मुलाटे, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १३०
- **दलितांची आत्मकथने :** वासुदेव मुलाटे, स्वरूप प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २८०

# श्री तुकाराम-गाथेच्या अभ्यासकांसाठी एक उपयुक्त कोश

कल्याण काळे

'श्री तुकाराम-गाथा शब्दार्थ संदर्भ कोश' हा कोश डॉ. मु. श्री. कानडे आणि श्री. रा. शं. नगरकर या दोघांनी मिळून सिद्ध केला आहे. यापूर्वी या दोघांचेही अनेक ग्रंथ स्वतंत्रपणे प्रसिद्ध झाले आहेत आणि संशोधनाच्या क्षेत्रातील त्यांचा अधिकार सिद्ध आणि सर्वज्ञात झालेला आहे.

गेल्या सात-आठ वर्षांत डॉ..मु. श्री. कानडे यांनी संत-साहित्य-संदर्भ कोश स्वतंत्रपणे सिद्ध केला आहे. तसेच पीएच. डी.च्या संशोधनाच्या निमित्ताने तयार केलेली दासबोध शब्दार्थ-संदर्भ वृहच्छब्दसूचीही आता प्रकाशनासाठी तयार आहे. श्री. रा. शं. नगरकरांचेही 'भागवतमहापुराण आणि ज्ञानेश्वरी' आणि 'गृहदेवता' हे संशोधनपर ग्रंथ याच काळात प्रसिद्ध झाले आहेत. या उभयतांनी संयुक्तरीत्या प्रथम श्री. ज्ञानदेवांच्या अभंगांचा सार्थ चिकित्सक गाथा सिद्ध केला. त्यानंतर प्रस्तुतचा श्री तुकाराम-गाथेचा शब्दार्थ-संदर्भ कोश सिद्ध केला आणि त्यानंतर लगेच श्री एकनाथी भागवताचा शब्दार्थ-संदर्भ कोशाची आखणी करून त्याचे कार्य अर्धेअधिक पूर्णही करत आणले आहे. हे सर्व प्रकल्प त्यांच्या दीर्घ परिश्रमशीलतेची साक्ष देतील.

प्रस्तुत श्री तुकाराम-गाथा शब्दार्थ संदर्भ कोश हा श्री. अनंत भालचंद्र चितळे यांनी रामदासी प्रेरणा प्रसारक समुदाय या संस्थेतर्फे प्रकाशित केला आहे. या कोशाला देहूचे संत तुकाराम संस्थान, पुणे विद्यापीठाचे ज्ञानदेव अध्यासन आणि ह. भ. प. श्री किसनमहाराज साखरे यांच्यामार्फत प्रकाशनार्थ अनुदान मिळाले आहे. याप्रकारचे कोणतेही कार्य आर्थिक पाठबळाशिवाय होणे ही अशक्यप्राय गोष्ट आहे. वरील अनुदानांमुळे या कोशाचे प्रकाशनकार्य व्यवस्थितपणे आणि निर्विघ्नपणे होण्यास फारच मोठी मदत झाली आहे.

तुकारामांच्या अभंगांच्या गाथेचे मुद्रण इ. स. १८६२ पासून होऊ लागले. गाथेच्या केवळ संहितात्मक, सटीप आणि सार्थ अशा निरनिराळ्या आवृत्त्या आजपर्यंत प्रकाशित झाल्या आहेत. काही आवृत्त्यांमध्ये तळटीपांमध्ये अथवा गाथेच्या शेवटी शब्दार्थ दिले गेले आहेत. पण संपूर्ण शब्दकोशमात्र आजमितीपर्यंत तयार करण्यात कोणी पुढाकार घेतला नव्हता, असा शब्दकोश तयार न होण्याचे कारण तशी आवश्यकताच कोणाला वाटली नसावी. तुकारामांचे अभंग घरोघर गायिले जात आहेत. ते आबालवृद्धांपर्यंत सर्वांना सुगम आहेत, त्यांची भाषा अतिशय सोपी आहे; अशी समजूत त्यामागे असावी.

पण तुकारामगाथेची सुगमता ही एक कल्पनाच मानली पाहिजे. कारण तुकाराममहाराजांचे अभंग हे अगदी सोपे आहेत ही समजूत त्यांच्या सर्वसाधारण जनतेच्या नित्य श्रवणातील आणि

नित्य पठनातील काही अभंगांवरून दृढमूल झालेली असली तरी त्यांचे बाकीचे बरेचसे अभंग अभ्यासकांची परीक्षा पाहणारे आहेत. तुकाराममहाराजांच्या अभंगांच्या सार्थ गाथा आजपर्यंत अनेकांनी संपादित केल्या आहेत. पण त्यातील कित्येक अभंगांचे अर्थ स्वीकार्ह वाटत नाहीत. निरनिराळ्या अभ्यासकांनी लावलेल्या अर्थामध्ये कमालीचा फरक आढळतो. त्यामुळेच डॉ. रा. गो. भांडारकर, वा. व. पटवर्धन, ग. ह. केळकर इ. मंडळींना दर शुक्रवारी बसून तुकारामांच्या अभंगांची चर्चा करण्याची गरज वाटली असावी. या अभंगांच्या चर्चेचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत. पण अनेकांनी चर्चा करून काही अभंगांचे अर्थ निश्चित केले असले तरी तेही सर्वांचे समाधान करू शकतील असे नाहीत. वै. ह. भ. प. सोनोपंत उर्फ मामासाहेब दांडेकरांनी 'श्री तुकोबांचे सर्व अभंग लागणे, ही जवळजवळ अशक्य कोटीतील गोष्ट आहे' असे या संदर्भात उद्गार काढले आहेत. तुकाराममहाराजांचे अनेक अभंग वाचल्याबरोबर आपल्याला त्यांचा अर्थ कळल्यासारखा वाटतो खरा, पण त्यांचा अन्वयपूर्वक अर्थ लावू गेल्यास आपण अडचणीत येत आहोत, असा अनुभव प्रत्येक अभ्यासकाला आल्यावाचून राहत नाही.

तुकारामांच्या अभंगांच्या दुर्बोधतेमागे त्यांच्या भाषेत आणि आपल्या भाषेत काळामुळे पडलेले अंतर, त्यांच्या भाषेतील संस्कृतप्रचुर शब्द, त्यांनी घडवलेले नावीन्यपूर्ण शब्द, त्यांनी वापरलेले वैशिष्ट्यपूर्ण अपभ्रंश, त्यांच्या अनुभवसृष्टीची गूढता, त्यांनी हेतुपुरःसर केलेले वैचित्र्यपूर्ण प्रयोग, त्यांची सूत्रबद्ध शैली इ. अनेक कारणे सांगता येतील. भाषेची प्राचीनता हे मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकाला अडचणीचे वाटण्याचे कारण नाही. पण आजच्या काळात मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक विरळ झालेले आहेत. त्यामुळे सर्वसाधारण वाचकाला ती भाषा दुर्बोध वाटतेच. तुकाराममहाराजांनी त्यांच्या पूर्वकालीन संतांच्या वाङ्मयाचा चांगला अभ्यास केला होता. त्यामुळे त्यांच्या भाषेचे संस्कार त्यांच्या वाणीवर अपरिहार्यपणे झाले आहेत. ज्ञानेश्वरांच्या कित्येक वचनांचे अनुवाद तुकाराममहाराज आपल्या अभंगातून करताना दिसतात. उदा. 'जैसा गळी मीनु आमिषे । भुलविजे गा' (ज्ञा. ३.२१३) आमिषाचिये आसे गळ गिळी मासा । (तु. ६८८) हो कां जयाचिया प्रीति । अमूर्त हा आला व्यक्ती (ज्ञा. ४.१२) अमूर्त मूर्तिमंत होय भक्तीच्या सुखे । (तु. १५८०); आता गृहादिक आघवे । ते काही न लगे त्यजावे (ज्ञा. ५.२२) न लगे हा लौकिक सांडावा वेव्हार। घ्यावे वनांतर भष्मदंड (तु. ९९) इत्यादी ज्ञानेश्वरांच्या काळात रूढ असलेले कितीतरी शब्द तुकारामांच्या भाषेत सहजपणे वावरताना दिसतात. उदा. पायवणी (१९७४), भात्तुके (१९७२), आराणूक (१९६०), मविती (१९२६), नाथिला (४२३४), नुघडिता (१३७२), दादुला (२५००), दातार (१२९१), थिल्लर (६२१), बहुडा (४६८), फुंज (१००१), पेणें (५६१), देवकीसुत (१५७६), पुंगाळले (४१५९), हमामा (१५४), वयसा (४४६६) या शब्दांचे अर्थ सर्वसाधारण वाचकांना माहीत नसतात.

तुकाराममहाराजांची भाषा साधी सोपी असली तरी त्यांच्या वाचनाचे संस्कार त्यांच्या भाषेवर झालेले आहेत. तुकाराममहाराजांनी संस्कृत ग्रंथांचे वाचन केले होते की नाही हे

निश्चितपणे सांगता येत नसले तरी संस्कृतप्रचुर भाषा वापरणाऱ्या अनेक मराठी ग्रंथांचे त्यांचे वाचन असलेच पाहिजे, हे त्यांच्या भाषेतील संस्कृतप्रचुर शब्दांचा वापर पाहता सहज लक्षात येते. त्यांच्या भाषेत शेकडा ३१ टक्के शब्द संस्कृत तत्सम आहेत असे निरीक्षण या उभय संपादकांनी नोंदवलेले आहे. त्यातील काही शब्द पुढे दिले आहेत. भक्तिभाग्यप्रेमा (१५७), सबाह्यअंतरसाक्ष (४४०६), क्रियमाणसंचितपारब्ध (२९४१), शुकनळिकान्याय (२०४२), धर्मप्रतिपालक (६७४), धर्मसंस्थापण (४५८३), सजानायक (४५८९), मुखप्रभाराशी (४५४९), रिद्धिसिद्धिमुक्ती (३७५०), क्रियाकर्महीन (२९३३), लवणकणिका (२९२६), संतसमागममेळ (२९१५) इत्यादि.

संस्कृतप्रमाणेच फारसी भाषेचाही प्रभाव तुकाराममहाराजांच्या भाषेवर झालेला आहे. तुकारामांच्या संपूर्ण गाथेत एकूण १६३ शब्द म्हणजे शेकडा २ टक्के फारसी शब्द आढळतात. उदा. इशारत, असमान, जिनस, ताजवा, फजितखोर, महजर, मुलामा, मोकासा, वासलात, हवाला, हिलाल इत्यादि. संपादकद्वयांनी या सर्वच्या सर्व १६३ अरबी-फारसी शब्दांची सूची परिशिष्टात दिली आहे. सर्वसामान्यांच्या भाषेला अपरिचित असलेल्या अशा शब्दांमुळे तुकारामगाथेची भाषा दुर्बोध होते.

तुकाराममहाराजांनी वापरलेल्या अनेक शब्दांचे अर्थ आज रूढ असलेल्या अर्थापेक्षा एकदम वेगळे आहेत. उदा. ब्रह्मगोळ (वर्णसंकर) २९७२, भाडेकरी (ओझेकरी) ६७, कूट (निंदानालस्ती) १९, ढसाळ (सढळ) १७४८, रिते (निरर्थक) २१६९, एकविध (एकनिष्ठ) २६४०, परदेशी (पोरका) ४३८२, आरूष (बोबडे) २५५३, एकांगी (एकाकी) ९५९, मानणे (व्यापणे) ३३१, हेवा (हाव, इच्छा) २५९५, अंगरखा (कामचुकार) २८१४ इत्यादि.

तुकाराममहाराजांनी अनेक शब्द नव्याने घडविलेले आहेत. त्यामुळे ते अपरिचित वाटतात. उदा. धर्मठक (धर्माच्या नावाखाली ठकविणारा) ९८, इच्छादानी (इच्छा पूर्ण करणारा) ४०, पिकधरणी (पिकदाणी) १७२४, झोंडाई (दांडगेपणा) २०२६, कंठाकंठ (गळामिठी) ४५८०, फटमर (पळपुटा) १०७१, अवळा भुलवणा (स्त्रियांना भुलवणारा) ६५८, मत्तिलंड (बुद्धिभ्रष्ट) ७९०, जनबुद्धि (सामान्य लोकांची समजूत) ९२२, प्रीतिउभड (प्रेमाचा उमाळा) २६५६.

सामासिक शब्दातील घटकांचा विशिष्ट क्रमच आपल्या परिचयाचा असल्यामुळे त्यात फेरफार झाला की तो शब्द एकदम अपरिचित वाटू लागतो. तुकाराममहाराजांनी समासघटकांचे परिवर्तन अनेक ठिकाणी केलेले आहे. उदा. सहस्र सोळा (सोळा सहस्र) ११९२, योगभाग्ये (भाग्य योगे) १४११, अस्तउदयाची (उदयास्ताची) २०११, बाईटबरे (बरेबाईट) ३५४०, पुण्यपाप (पापपुण्य) ४१३९, मंडितचतुर्भूजा (चतुर्भुजामंडित) १५७५.

तुकाराममहाराजांच्या भाषेत अनेक ग्रामीण पर्यावरणातील शब्द आढळतात. आजच्या प्रमाणभाषेला हे शब्द अपरिचित आहेत. मुंडासे (पागोटे) ३०८२, मुंडी (डोके) ३९३८, दादला (नवरा) ४५८, बोळावा (सोबती) १२६६, बांड (कणसे न आलेला जोंधळा) २३३६, कुळपणी (शेतजमीन सपाट करणे) ११४७, ताटी (झोपडी) २४८५, झोपा (दार) २४७६, कलवडू (शेणामातीने लिंपलेले मडके) ४२१९, सोकरणे (सांभाळ करणे) ११४९, तिळवण

(तिलांजली) २६६८, डोहोर (कातडे रंगवणारी एक जात) २८७३, मुव्हळी (नवरीबरोबर सोबत जाणारा) १९५१ इत्यादि.

तुकाराममहाराज अनेक वेळा विशेषनामांची अपभ्रष्ट रूपे वापरतात. उदा. धुरू (ध्रुव) १०२३, वाल्हा (वाल्या कोळी उर्फ वाल्मकी) २५७, सुऱ्या (सूर्य) १५५, बौध्य (बुद्ध) ४१६०, दसवंती (यशोदा) ३८८, भांबगिरी (भामनाथ डोंगर) ४३५४, बहिरव (भैरव) ७८९, स्वेतवंध (सेतुबंध, रामेश्वर) ४१२८ इत्यादि.

याखेरीज समकालीन भाषेत रूढ असलेले पण आता वापरातून गेलेले असे कित्येक अपरिचित शब्द तुकारामांच्या भाषेत आढळतात. उदा. भाज (पत्नी) ३०१, वारिके (वाहन) १५३७, वावणे (वाजविणे-टाळी) १२३२, वाहाळ (पाण्याचा लहान प्रवाह) २५७, पागोरा (गोफण) ११४७, दारवंटा (उंबरा) ६५२, पावटनी (पायरी) १८९, लाडस्य (लाड) ३७९०, खिरम्या (उंची वस्त्र) ३९०७, पाधाणी (अडाणी स्त्री) ४४५१, चाभाड (जबडा, तोंड) १७१८, भगल (ढोंग) २८९२, घुसमांडणे (रगडणे) ३०७८, तोंडक (भांडण) ४४१७ इत्यादि.

अशा प्रकारच्या अनेक शब्दांमुळे तुकाराम गाथा एकदम समजायला अडचण निर्माण होते. त्यासाठीच कोशाची गरज भासते. ज्ञानेश्वरीच्या संदर्भात असे आधुनिक शास्त्रीय पद्धतीने तयार केलेले तीन तरी चांगले कोश आज उपलब्ध आहेत. प्राचीन काळातही ज्ञानेश्वरीतील महत्त्वाच्या शब्दांचे अर्थ देणारे छोटे मोठे काही कोशवजा ग्रंथ उपलब्ध आहेत. तुकारामगाथेच्या बाबतीत मात्र एकही परिपूर्ण कोश उपलब्ध नव्हता. काही गाथांच्या आवृत्त्यांमधून कठीण शब्दांचे अर्थ देणाऱ्या शब्दसूची जोडलेल्या आहेत. काहींमध्ये तळटीपांमधल्या काही तुरळक शब्दांचे अर्थ दिलेले आढळतात. रघुनाथशास्त्री गोडबोल्यांचा हंसकोश हा समग्र प्राचीन संतवाङ्मयाच्या संदर्भातील कोश असल्यामुळे त्यातील शब्दांच्या निवडीवर मर्यादा येतात. प्राचीन साहित्यातील प्रत्येक महत्त्वाच्या साहित्यकृतीच्या संदर्भात स्वतंत्र कोश होण्याची गरज आहे. त्यामुळे तुकाराममहाराजांच्या गाथेतील सर्व महत्त्वाच्या कठीण शब्दांचे अर्थ त्यांच्या संदर्भांसह देणारा प्रस्तुतचा हा कोश निश्चितच स्वागतार्ह आहे.

हा कोश म्हणजे प्रत्येक पद देणारा पदकोश नाही. तर सर्वपरिचित सामान्य शब्द वगळून कठीण वाटणारे सर्व शब्द, त्यांचे विविध अर्थ, त्या अर्थांचे महत्वाचे संदर्भ, त्या शब्दाच्या सर्व विकृती, त्यापासून बनलेले वाक्प्रचार व त्यांचे पत्ते अर्थांसह देणारा एक अतिशय उपयुक्त असा कोश आहे. शब्दांचे निरनिराळे अर्थ क्रमांक देऊन नोंदवले आहेत. वाक्प्रचार देताना मात्र विशिष्ट क्रम पाळलेला नाही. विशिष्ट वाक्प्रचार अचूक सापडण्याचे दृष्टीने ते अकारविल्ह्याने देणे आवश्यक होते. शब्दांतर्गत वाक्प्रचारांची संख्या लहान असल्यामुळे ते अकारविल्ह्याने न दिल्याने फारसे विघडत नसले तरी शास्त्रीय पद्धतीच्या दृष्टीने ते आवश्यक होते. या कोशात एकूण ८८०० शब्दांचे अर्थ दिलेले आहेत. कोशाच्या शेवटी निरनिराळ्या उपयुक्त सूची परिशिष्टांच्या रूपाने दिल्या आहेत. (१) विशेषनामे, (२) वृक्ष, वेली व वनस्पती इत्यादि ३) पशू-पक्षी, (४) कीटक, (५) एकार्थी जोडशब्द, (६) अरबी-फारसी शब्द, (७) म्हणी हे त्या परिशिष्टांचे विषय आहेत. कोशाला जोडलेल्या प्रस्तावनेमध्ये प्रस्तुत कोशाची

आवश्यकता, कोशरचनेतील धोरण, तुकाराममहाराजांच्या शब्दसंग्रहाचा परिचय इत्यादी मुद्यांचे विवरण केले आहे. ह. भ. प. किसनमहाराज साखरे यांचे आशीर्वाद आणि डॉ. सदानंद मोरे यांचा पुरस्कार या कोशाला लाभले आहेत.

हा शब्दकोश अशा प्रकारे उपयुक्त कोश असला तरी त्यात काही शब्दांच्या अर्थांच्या बाबतीत मतभेदाला जागा आहेत. 'दर्प' (म्हणजे प्राणनाश करण्याची शक्ती) २९५७ हा अर्थ त्या संदर्भात न पटणारा आहे. कंकर (दगडाचा तुकडा) ३७९ या शब्दाचा अर्थ बरोबर असला तरी भाषाप्रयोगाच्या दृष्टीने असमाधानकारक आहे. (दगडाचा) खडा असा शब्दप्रयोग अधिक योग्य ठरला असता. कवी ('माझी पाठ करा कवी' ७९) याचा अर्थ काव्यकर्ता असा नसून काव्यरचना असा हवा. काव्यरचना या अर्थाने कवी शब्दाचा प्रयोग ग्रामीण भाषेत अद्यापही होतो, असे डॉ. सदानंद मोरे यांचे निरीक्षण आहे. गाथ्यातील एकोणऐंशीव्या अभंगात हाच अर्थ चपखलपणे बसतो. मध्ययुगीन मराठीत शेवटचा अवयव उघडून बाकीचा शब्दांशपूर्ण शब्दाच्या जागी वापरल्याची काही उदाहरणे आढळतात. उदा. विरु (विरुद्ध या अर्थी ज्ञाने. २.५३, १३-६६९, १६-४६०) ढुंग (ढुंगण या अर्थी तुका. २३५५, ३७७२) जेवा (जेवणखर्च या अर्थी तुका. ११४७) जागर (जागरण या अर्थी) इत्यादि. कवी हा शब्द याच प्रकारचा दिसतो. फुंद (रडणे) ४५४४, या ठिकाणी दिलेला अर्थ योग्य आहे व तो शब्दही व्युत्पत्तीच्या दृष्टीने बरोबर आहे. पण अभंग क्र. २६०१ (फुंदाचे ते कष्ट भंगा मूळ) येथे तो लागू पडत नाही. या ठिकाणी आणि अभंग क्र. २४५१ येथे 'ताठ्याने वागणे' असा दिला आहे. या दोन्ही ठिकाणी 'फुंज' (ताठ्याने वागणे, ताठा) असा शब्द अभिप्रेत आहे. फुंद शब्दाला तो अर्थ 'स्थिरस्य गतिश्चिन्नीया' या तत्त्वानुसार दिला असावा. 'फुंज' ऐवजी 'फुंद' हा हस्तदोष असावा. आत्रीतला (आततताईपणा) ३६०४ असा अर्थ या कोशात दिला आहे. पण तो अर्थ संदर्भातही योग्य बसत नाही आणि व्युत्पत्तीच्या दृष्टीनेही पटत नाही. म्हणून गाथेच्या काही संपादकांनी त्याऐवजी आहाच ते असा पाठभेद स्वीकारला आहे. (स. के. नेऊरगावकर) शब्दकोशात मुद्रणदोष असता कामा नयेत. या कोशात मात्र क्वचित् काही मुद्रणदोष राहून गेलेले आहेत. उदा. घुसमांडणे या शब्दाचा संदर्भ ३७८ दिला आहे. तो ३०७८ असा हवा होता. पृष्ठ वीसवर भगल शब्दाचा संदर्भ १८९२ असा दिला आहे. पण तो २८९२ असा हवा होता. 'घुमरी' या शब्दाचा एक पत्ता ४४२८ असा दिला आहे. पण त्या अभंगात तो शब्द सापडत नाही. तो निश्चितपणे मुद्रणदोष असला पाहिजे. असे मुद्रणदोष सुदैवाने कमी आहेत. पण कोशाची विश्वसनीयता सांभाळण्याच्या दृष्टीने असे मुद्रणदोष मुळातच नसावेत. वरीलसारख्या काही मतभेदांच्या आणि मुद्रणदोषांच्या जागा वगळता हा कोश बव्हंशी निर्दोष आहे. मोठ्या परिश्रमाने एक महत्त्वपूर्ण कार्य पार पाडल्याबद्दल संपादकद्वय अभिनंदनास पात्र आहे.

पण हेही लक्षात ठेवले पाहिजे की केवळ शब्दस्तरावरील दुर्बोधता कमी करण्यासाठी या कोशाचा अवश्य उपयोग आहे; पण तुकाराममहाराजांच्या गाथेतील दुर्बोधता ही केवळ शब्दस्तरापुरती मर्यादित नाही. शब्दस्तरावरील दुर्बोधता ही अगदी प्राथमिक स्तरावरील दुर्बोधता मानावी लागते. तशी ती सर्वच प्राचीन वाङ्मयात आढळते. पंडितकवींच्या काव्यातील

दुर्बोधता प्रामुख्याने याच स्तरावरची असते. ती दुर्बोधता दूर करण्यसाठी एखादा शब्दकोश हातात असला की काम भागते. त्यामुळे मोरोपंत, वामन पंडित इत्यादि कवींचे आकलन व्हायला अडचण पडत नाही. पण तुकारामगाथेची दुर्बोधता ही केवळ शब्दस्तराशी निगडित नाही ती भाषेच्या अंतरंगाशी भिडणारी अंत:स्तरीय दुर्बोधता आहे. तिच्या मुळाशी तुकारामांची विशिष्ट शब्दकळा आहे; पदबंध रचना, वाक्यरचना इत्यादि भाषिक स्तर आहेत; तसेच तुकाराममहाराजांना अभिप्रेत असलेल्या आशयाची गूढता आणि गहनता आहे; त्याच्या जोडीला तुकाराममहाराजांची मोजक्या शब्दात भरपूर आशय मांडण्याची विशिष्ट शैलीही आहे.

आधुनिक कवींप्रमाणे तुकाराममहाराज वाक्यघटकांची मोडतोड, अदलाबदल इत्यादि प्रयोग वारंवार करताना आढळतात. उदा. गोपी लाविला चंदन (१४९३), वसुदेव देवकीची बंद फोडुनी शाळा (१५७६), तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्शअंग (१७६७), सहित लेकुरे राहों सुखे (१९८४), ओवाळुनि तुझ्या वरुनि टाकिलो । (२२४६) त्यांच्या या रचना मर्ढेकरांच्या रचनांची आठवण करून देतात. मर्ढेकर शब्दांचा क्रमभंग करतात ते विशिष्ट हेतूने. तुकाराम वृत्तसौकर्यासाठी करतात. मर्ढेकरांना जीवनातील व्यस्तता, यांत्रिक जीवनातील कृत्रिमता दाखवायची आहे. ती अधिक परिणामकारक रीतीने दाखविण्यासाठी अनेक उपायातील क्रमभंग हे एक साधन आहे. पण मर्ढेकरी रचना कृत्रिम वाटते. पण तुकारामांची रचना स्वाभाविक वाटते. तुकारामांच्या अनेक अभंगांचा आशय गूढ आहे. त्यांना 'अरूपाचे रूप' दाखवायचे होते. साध्या व्यवहारभाषेत तो पकडता येणे कठीण आहे. त्यामुळे प्रतिमांचा वापर त्यांना अपरिहार्य झाला. त्या प्रतिमादेखील शाखाचंद्रन्यायाप्रमाणे त्या आशयाचा फक्त निर्देश करतात. प्रत्यक्ष आशय शब्दातीतच राहतो. तो प्रतीतिगम्यच असून ज्याचा त्यानेच समजून घ्यायचा असतो. भाषा सार्वत्रिक असल्यामुळे तो वैयक्तिक पातळीवरचा सूक्ष्म अनुभव तिच्या चिमटीत सापडत नाही. त्यामुळे त्या आशयासाठी कोशग्रंथ आणि अर्थ आवृत्त्या उपयोगी पडतीलच याची खात्री नाही. हा अर्थात कोशाचा दोष नव्हे. विशिष्ट मर्यादेपर्यंत त्याची उपयुक्तता आहेच आहे. डॉ. मु. श्री. कानडे आणि श्री. रा. शं. नगरकर यांचा हा कोश या दृष्टीने एक उत्तम प्रयत्न आहे. गाथेचे अभ्यासक त्याचा सन्मानपूर्वक आदर करतील अशी आशा करतो.

(श्री तुकाराम-गाथा शब्दार्थ संदर्भ कोश : संपादक : डॉ. मु. श्री. कानडे, श्री. रामचंद्र शं. नगरकर, प्रकाशक श्री. अनंत भालचंद्र चितळे, रामदासी प्रेरणा प्रसारक समुदाय, ४०/१५ अ, एरंडवन, पुणे ४११ ००४, पहिली आवृत्ती मार्च १९९९, पृष्ठ संख्या चोवीस + २२४. मूल्य २५० रुपये.)

□

कल्याण काळे
श्री. दीपक सह. गृह. संस्था,
९२/३ तुळशीबागवाले नगर, गोळवलकर गुरुजी रस्ता,
पर्वती, पुणे ४११ ००९.



अनुक्रमणिका






# वऱ्हाडी लोकगीतांचा चिकित्सक अभ्यास

डॉ. प्रतिमा इंगोले

लोकसाहित्याच्या अभ्यासाची सुरुवात तशी एकोणाविसाव्या शतकापासून झाली आहे. पण आतापर्यंतच्या अनेक अभ्यासकांनी, संकलन, रसग्रहण, विवेचन व प्रकाशन ह्याच स्वरूपाचा अभ्यास व कार्य जास्त प्रमाणात केलेले दिसून येते. प्रस्तुत प्रबंधात विदर्भापुरताच त्यातही लोकगीतांपुरताच विचार केलेला जरी असला तरी तो वस्तुनिष्ठ भूमिकेतून केला आहे. प्रथम ह्या परिक्षेत्रातील लोकगीताच्या बोलीचा लोकभाषा म्हणून अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. तत्पूर्वी वऱ्हाडच्या इतिहासाचा व भूगोलाचाही थोडक्यात मागोवा घेतला आहे. वऱ्हाडी लोकभाषेचा व्याकरण व भाषाशास्त्र ह्या दृष्टिकोनातून फारसा अभ्यास झालेला नाही. त्या दृष्टीने हा प्रबंध महत्त्वाचा आहे.

प्रस्तुत प्रबंधात लोकगीतांच्या आधारे वऱ्हाडी संस्कृतीचा व समाजजीवनाचा अभ्यास तर केला आहेच; पण चिकित्सा करण्याचा प्रयत्न केला आहे व त्यासाठी शास्त्रीय भूमिकेचा स्वीकार करण्याचाही प्रयत्न केला आहे. असा अभ्यास करताना लोकगीतांना आणि लोकभाषेला जास्तीत जास्त प्रमाणभूत मानण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या प्रकारात अभ्यासासाठी सुसंगत असणारी दिशा व भूमिका स्वीकारण्याचा व ती तंतोतंत सांभाळण्याचा प्रयत्न केला आहे.

त्यासाठी प्रामुख्याने वैदिक संस्कृतीचे पटल बाजूला सारून आणि संस्कृतचा वाढविलेला प्रभाव बाजूला करून जास्तीत जास्त लोकसंस्कृतीला व लोकभाषेला न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यातून खालील निष्कर्ष काढले आहेत.

### प्रकरण पहिले : वऱ्हाडचा इतिहास व स्वातंत्र्योत्तर काळातील वऱ्हाडी

१) अगस्ती ऋषी दक्षिणापयात येण्यापूर्वी ह्या भूभागात राजकुले असावीत व ह्या भूभागास विदर्भ अथवा वऱ्हाड म्हणत असावेत.

२) विदर्भ अथवा वऱ्हाड हे देशनाम वर्धानदीवरून पडले असावे. वर्धा नदीच्या पूर्वीच्या 'विदर्भा' नावावरून विदर्भ हे नाव प्रचलित झाले असावे. तसेच तिच्या पूर्वीच्या 'वरदा' नावावरून वऱ्हाड हे नाव कालांतराने सिद्ध झाले असावे. वऱ्हाड हे नाव प्राचीन असावे.

३) विदर्भाची मर्यादा आताच्या महाराष्ट्रापेक्षाही विस्तृत असावी. त्यात खानदेश, मराठवाडा, विदर्भ, छत्तीसगढ, नर्मदादक्षिणतीर, बस्तर, थोडा आंध्रचा भाग एवढा भूभाग समाविष्ट असावा.

४) अपभ्रंश भाषा हे वऱ्हाडी भाषेचे आद्यरूप होय. कारण तिलाच देशीभाषा म्हणत व वऱ्हाडला देश म्हणत. मराठीच्या आद्य अवस्थेला देशीभाषा म्हणत ही सामान्य लोकांची भाषा होती.



अनुक्रमणिका








प्रतिमा पंजाबराव इंगोले
जन्म : १०।१०।१९५३
(जन्मस्थळ : अकोला)
एम. ए. पीएच. डी.
राष्ट्रभाषा प्राथमिक परीक्षेत अखिल भारतातून सर्वप्रथम (हिंदी)
एम. ए. मराठी प्रथम श्रेणीत प्रथम. प्रबंधाचा विषय 'वऱ्हाडी लोकगीतांचा चिकित्सक अभ्यास'. पूर्वी प्राध्यापक (५ वर्षे) आता लेखन.

प्रकाशित पुस्तके :
१. हजारी बेलपान (कथा), २. अकसिदीचे दाने (कथा), ३. सुगरनचा खोपा (कथा), ४. जावयाचं पोर (कथा), ५. लेक भुईची (कथा), ६. हिरवे स्वप्न (कथा), ७. श्यामवेल (संपादित), ८. वाघाचे घर (बालवाङ्मय), ९. चतुराईचे फळ (बालवाङ्मय), १०. भुलाई (काव्यसंग्रह), ११. बयनाचे बोल (लेख), १२. झेंडावाईचं गाणं (लेख), १३. स्त्रीचे भावविश्व आणि आधुनिकता (लेख), १४. बुढाई (कादंबरी), १५. अंधारपर्व (कथा), १६. आगळे जंगल (बालकादंबरी), १७. करारी आजी (बालकथा), १८. अपंगाची करामत (बालकथा),१९. भंडाऱ्याचे गाव (बालकादंबरी), २०. ऋणमोचन (संपादित), २१. श्यामतुरा (संपादित), २२. श्यामगाणे (संपादित), २३. सोनपीस (संपादित).

पुरस्कार :
१. यशवंतराव चव्हाण वाङ्मय पुरस्कार, २. राज्य पुरस्कार, ३. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा गोखले पुरस्कार, ४. शकुंतला जोग पुरस्कार, ५. परिवर्तनवादी साहित्याचा नागसेन पुरस्कार, ६. उत्कृष्ट स्त्री जीवनपर लेखन पुरस्कार, ७. पां. वा. गाडगीळ पुरस्कार, ८. कृष्णाबाई मोटे पुरस्कार, ९. वसंत वऱ्हाडपांडे बालकादंबरी पुरस्कार, १०. ग्रामीण साहित्यपरिषदेचा रोहमारे पुरस्कार, ११. लोकमत पुरस्कार (दैनिक लोकमत, नागपूर), १२. लोकमित्र सरदार पुरस्कार, १३. म. सा. प.चा शिरोळे पुरस्कार, १४. महानुभाव ग्रंथोत्तेजक पुरस्कार, १५. डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुरस्कार, १६. कलमकार मंच इंदौरचा सामाजिक पुरस्कार, १७. म. सा. प.चा विश्वनाथ पार्वती गोखले पुरस्कार.



अनुक्रमणिका

५) मराठी भाषेचे तान्हे रूपडे हीच वऱ्हाडी भाषा होय. मराठी भाषेचा विकास घडवून आणण्यात वऱ्हाडीचा सिंहाचा वाटा आहे.

### प्रकरण दुसरे : लोकभाषा व संस्कृती

१) माणसाने गरज वाटली म्हणून प्रयत्नपूर्वक भाषा तयार केली. हीच लोकभाषा होती. हीच खरी मातृभाषा असते. तिच्यावर माणसाचा पिंड पोसला जातो.

२) वऱ्हाडी भाषा महाराष्ट्राची आद्य लोकभाषा आहे. लोकभाषेतून प्रमाणभाषा उत्क्रांत होते. मराठी अशी उत्क्रांत झालेली भाषा आहे.

३) संस्कृत भाषाही ह्याचप्रमाणे वऱ्हाडी लोकभाषेपासून उत्क्रांत झालेली भाषा आहे.

४) सामान्यांचे भावविश्व अभिव्यक्त करणारी समूहमनाची दैनंदिन व्यवहाराची उत्स्फूर्त बोलभाषा म्हणजेच लोकभाषा होय. वऱ्हाडी ही आजच्या विदर्भाची लोकभाषा आहे.

५) पूर्वी वऱ्हाडीचे आद्यरूप असलेली भाषा महाराष्ट्राची लोकभाषा होती. आणि सोयीसाठी तयार केलेली प्रमाणभाषा संस्कृत होती.

६) लोकभाषा व प्रमाणभाषा एकमेकींना समांतर असतात पण लोकभाषा पूर्वी तयार झालेल्या असतात.

७) बोलीभाषा आदिम, प्रवाही, सरल, सोप्या व गतिमान असतात. बोलीभाषेच्या शब्दरूपामुळे भाषेच्या मुळाशी जाता येते.

८) ज्याला आपली भाषा अडाणी वाटते, तो केव्हाही गुलाम होऊ शकतो.

९) संस्कृती म्हणजे त्या त्या प्रदेशातील लोकमाणसांनी स्वीकारलेले, गौरवलेले, जतन केलेले आणि नैसर्गिकरित्या घडलेले गोंदणासारखे संस्कार.

### प्रकरण तिसरे : वऱ्हाडीचे प्रादेशिक भेद

१) भाषेवर हवामानाचे व प्रदेशाचे परिणाम होतात. त्यामुळेच आज नागपुरी व वऱ्हाडी पृथक झाल्या आहेत.

२) वऱ्हाडी भाषेतील ध्वनींचे आणि अर्थवाहक घटकांचे कार्य वाटेल तसे चाललेले नसून तत्त्वानुसारच आहे. ही तत्त्वे शोधून काढण्याच्या त्यांच्या मर्यादा, नियम आणि अपवाद शोधून काढून ते साकल्याने मांडण्याची आज गरज आहे.

३) सीमावर्ती वऱ्हाडीवर तेलगू भाषेचा फारसा परिणाम झाल्याचे दिसून येत नाही.

४) बहिणाबाईंचे काव्य वऱ्हाडीच आहे. तिला फार फार तर 'वऱ्हाडी खान्देशी म्हणावे. पण खान्देशी वऱ्हाडी' असे म्हणणे बरोबर नाही.

### प्रकरण चवथे : लोकगीते स्वरूप वैशिष्ट्ये

१) लोक म्हणजे परका दुसरा अशी अर्थच्छटा असणारा शब्द आजही लोकमानसात व लोकगीतात विद्यमान आहे.

२) समूहमनाचा लवचिक गेय व अनुभूतीशी प्रामाणिक राहून निष्काम भावनेने केलेला व समाजमनाचे भरणपोषण करणारा, सृष्टीचक्राशी संबंधित किंवा भूमीतत्त्वातून उत्पन्न होणाऱ्या प्रेरणेने निर्माण झालेला आणि सृष्टीच्या नादाशी तादात्म्य पावणारा कलात्मक असा आविष्कार म्हणजे लोकगीत !

३) लोकगीत हे स्थळकाळाच्या मर्यादा न पाळणारे अमर्याद असे लोकसाहित्याचे गेय व मनोहारी दालन आहे. जे वळणावळणावर नवे रूप घेऊ शकते.

४) पृथ्वीतत्त्वातून स्फुरलेला उत्स्फूर्त, उत्कट, लवचिक गेय व हितकारक असा समूहमनाचा अनुभूतीशी प्रामाणिक असा सृजनात्मक व सृष्टीचक्राशी संवादी आविष्कार म्हणजे लोकगीत होय.

५) 'गाथा' शब्द वेदपूर्वकालापासून आहे. गाथा म्हणजे प्रदेशांना जोडणारे गीत म्हणजेच लोकगीत.

६) लोकगीत सर्वंकष, सार्वत्रिक व सृष्टितत्त्वाशी संबंधित चिरंतन गीत असते.

७) लोकगीत आणि लोकभाषा ह्यांचा संबंध घनिष्ट आणि मानवी विकास साधणारा असतो.

८) लोकगीतांची निर्मिती प्रेरणा आणि लोकगीतांची आविष्कार शैली ह्या वेगळ्या आहेत. त्यामुळे शास्त्राधाराची प्रमाणे लावून लोकगीतांचे मूल्यमापन करता येत नाही. त्यासाठी लोकाधारी समीक्षा आवश्यक आहे.

९) लोकगीत एकसंघ व परिपूर्ण अनुभव प्रतीत करते. त्यामुळे पूर्ण ठरते. तरीही प्रवाही असते.

१०) लोकगीतात यात्वात्मकता, प्रतीकात्मकता, मांत्रिक-शरणता आणि नैसर्गिकता जाणवतात.

११) लोकगीताला पृथ्वीच्या चुंबकशक्तीपासून भारलेपण प्राप्त होते. तर पृथ्वीच्या स्वत:भोवती व सूर्याभोवती फिरण्याच्या दुहेरी भ्रमणामुळे लय प्राप्त होते.

## प्रकरण पाचवे : वऱ्हाडी लोकगीतांचे ठळक प्रकार

१) लग्नगीते प्राचीन आहेत. त्यांना धवळागीतेही म्हणतात. रहानविधी आदिमातेचा व स्त्री-पुरुष तत्त्वाचा पूजाविधी ठरतो. 'निर्ऋति' ही महामाता आहे. ती जशी सर्जनाची देवता आहे तशीच संहाराची देवता आहे. गोंधळात स्त्रीतत्त्वाची तर रहानात स्त्री-पुरुष दोन्ही तत्त्वाची पूजा केली जाते. तद्‌वतच पृथ्वीच्या अतिंद्रिय शक्तीची ही पूजा ठरते. पूर्वजांच्या रूपात क्षेत्रपती व क्षेत्र ह्यांचीच ही पूजा असते.

२) पाळणागीते प्राचीन आहेत तर अंगाईगीते नादमाधुर्याची गाणी आहेत.

३) भुलाई उत्सव मातृत्व प्रस्फुरणासाठी करतात.

४) झेंडवाईची गाणी ही विश्वात्मक कल्याणाची गाणी आहेत. ती लोकमानसाची वेद ठरतात.

५) नागपूजा म्हणजे संस्कृती संकराची खूण असणारी प्रतिकात्मक पूजा ! मग हा संकर लौकिक, अलौकिक, मानवी, अमानवी, अथवा सांकेतिक प्रतिकात्मक, लाक्षणिक अथवा आर्य-अनार्य ह्यांच्या महासंकराचे सूचक करणाराही असू शकतो आणि ठावागीते म्हणजे प्राचीनमय स्थळीय संकरस्मरण सोहळागीते असू शकतात.

६) अहेव संकल्पना मांडणारी गीते ही वैदिक धर्माच्या प्रचारानंतरची गीते ठरतात. विधवा स्त्रीच्या मरणप्राय जीवनापेक्षा सवाष्णीचे मरण श्रेष्ठ असाही त्यातून ध्वनी निघतो. अहेव संकल्पना मांडणारी गीते स्त्रीची अन्यागीते ठरतात.

७) डोहाळजेवण गीते मातृत्वाची कौतुकगीते आहेत.

## प्रकरण सहावे : लोकगीतातून घडणारे समाजदर्शन

१) लोकगीतातून घडणारे समाजदर्शन हे व्यापक, विस्तृत, सखोल व मूळ परंपरेपर्यंत जाऊन पोहचणारे व त्याचवेळी समाजहीत सांभाळणारे असते.

२) सर्वच जातीजमातीतील, सर्वच मानवी समुहांच्या लोकजीवनाचे आणि भावजीवनाचे परिपूर्ण व अलवार चित्रण लोकगीतात आढळते. शांत जलाशयाच्या पाण्यात जसे आकाश सामावलेले असते तसे लोकगीतात लोकजीवन सामावलेले असते.

३) गावगाड्याचे बदलते रंगतरंग लोकगीतातून जाणवतात. शूद्र आणि अंत्य वर्णाच्या कपाळी वर्णव्यवस्थेमुळे अधिक दु:खे आली आहेत. वर्णव्यवस्थेच्या परिणामाचे विदारक स्वरूप लोकगीतातून स्पष्ट दिसून येते.

४) लोकगीतात जातीघटकांचे ग्रामांतर्गत जीवन पुरेपूर प्रतिबिंबित झालेले आहे. ग्रामातंर्गत समाजघटकांचे जीवन कृषिकेंद्रित आहे.

५) वतनदारी व्यवस्थेचा परिणाम जातीव्यवस्था वळकट होण्यात तर झालाच पण त्यामुळे परंपरागत आर्थिक स्थितीही ठराविक स्वरूपाची बनत गेली. त्यामुळे सहजसुंदर अशी ग्रामव्यवस्था ढासळू लागली.

## प्रकरण सातवे : लोकगीतातून घडणारे सांस्कृतिक दर्शन

१) लोकगीतांची प्रकृती लोकजीवनाचे संचित सांभाळण्याची असते.

२) संस्कृती म्हणजे उन्नत असे लोकजीवनच असते. संस्कृतीचे दृश्यरूप लोकांच्या साहित्यात असते. कारण समूहाची मने पृथगात्र असतात.

३) संस्कृती आणि लोकगीते परस्परावलंबी असतात. ही दोन्हीही लोकधर्माचीच महत्त्वाची अंगे असतात.

४) धर्माचे प्राथमिक एकात्मक रूप लोकगीतांच्या आधारेच कळू शकते.

५) लोकगीतातून सांस्कृतिक जीवनातील चढ-उतार आणि परंपरागत लोकजीवनाचे पडसाद तर उमटतातच पण प्रादेशिक अस्मितेचे हुंकारही वारंवार व्यक्त होतात.

## प्रकरण आठवे : लोकगीते आणि स्त्रीजीवन

१) स्त्रियांच्या दारुण स्थितीला पुरुषप्रधान संस्कृतीच कारणीभूत आहे. पुरुषाने स्त्रीला निरिंद्रियपणा बहाल केला आहे.

२) पोथीनिष्ठा व पुनर्जन्माच्या विचाराने स्त्रीचे अधिक नुकसान केले. एकंदरच स्त्रीचे शारीरिक, मानसिक, बौद्धिक, आर्थिक व लैंगिक शोषण करण्यात आले.

३) स्त्री केवळ मादी! एक उपभोग्य वस्तू हा विचार वा समज खोडण्याचा फारसा प्रयत्न संतांनी केल्याचे आढळून येत नाही.

४) स्त्रीचा दुर्दम्य आशावाद स्त्रीची मानसिकता निर्व्याज राखण्यास मदत करू लागला.

५) स्त्रीच्या सर्जनशीलतेत स्त्रीचे सामर्थ्य आहे.

६) पुरुषसापेक्षेतूनच शूचित्वाच्या कामना साकारल्या. पुरुषप्रधान संस्कृतीने स्त्रीची नैसर्गिक कामवासनाही गुदमरून टाकली.

७) स्त्रीमधील स्त्रीत्व नाहिसे झाल्यामुळे तिची आक्रमकता लुळी पडली. ती अपत्य संगोपनात धन्यता मानू लागली.

## प्रकरण नववे : वैदर्भीय स्त्रीजीवनातील स्थित्यंतरे

१) ऋग्वेदपूर्व विदर्भातील लोकगीतांच्या परंपरेतून स्त्रीला स्त्रीत्वाचा अभिमान होता व ती आपल्या सर्जनशीलतेचा गौरव करीत होती, असे दिसून येते.

२) मातृसत्ताक समाजपद्धतीच्या अस्ताबरोबरच स्त्रियांच्या अवनतीला सुरुवात झाली.

३) प्राचीन काळीही स्त्रियांना निर्भेळ असा वेदपठणाचा अधिकार नव्हताच. त्यामुळे तिला वेदकाळातही उपनयनाची संधी मिळत नव्हती.

४) बळी हा शेवटचा अनार्य संस्कृतीचा वारस होता. त्यानंतर स्त्रीच्या परवशतेला सुरुवात झाली.

५) प्राचीन काळी दोन क्रूरप्रथा मान्यता पावल्या होत्या - एक आपली पत्नी पाहुण्याला शरीरभोगार्थ देण्याची व दुसरी नियोगाद्वारा पुत्रप्राप्ती करवून घेण्याची ह्या दोन्ही प्रथा स्त्रीला वस्तू समजतात.

६) माता म्हणून केला जाणारा स्त्रीचा गौरव हेही एक ढोंगच होते. मनुस्मृतीने कहर केला विवाह हाच उपनयन संस्कार ठरविला.

७) गौतमबुद्धानेही स्त्रियांचा वेगळा संघ स्थापन केला होता.

८) विदर्भातील प्राचीन राजकन्या बंड करताना आढळतात. त्यात लोपामुद्रा, दमयंती, रुक्मिणी, प्रभावती गुप्ता इंत्यादी आहेत.

९) इंदुमती, केशिनी ह्या कर्तृत्ववान वैदर्भिय स्त्रिया होत्या तर मुक्तावाई तपस्विनी होती. महदंबा पहिली कवयित्री होती.

१०) गाथा सप्तशतीत रेवा, रोहा, माधवी, अनुलक्ष्मी, पाहई, वद्धवही व शशिप्रिया इत्यादी कवयित्रींच्या कविता हालाने उद्धृत केल्या.



अनुक्रमणिका

११) मुस्लिम राजवट स्त्रियांच्या दृष्टीने अधिक घातक ठरली. पुरुषाच्या बाहेरख्यालीपणाने स्त्रीचा पोतेरा केला.

१२) जिजामातेने जगाला आत्मतेजाचा संदेश दिला.

१३) पुरुषांच्या दुटप्पीपणावर पहिला घणाघाती प्रहार विदर्भातील ताराबाई शिंदे ह्यांनी केला.

१४) स्वातंत्र्योत्तर काळात कायद्याने स्त्री-पुरुष समानता मिळाली. त्याचबरोबर घटस्फोटाचा व खावटी मागण्याचा व पुनःर्विवाहाचा अधिकार स्त्रीला देण्यात आला.

१५) द्विभार्या प्रतिबंधक कायद्याबरोबरच स्त्रीला वारसाहक्क मिळाला.

१६) अज्ञानामुळे स्त्रीला ह्या सवलतींचा फायदा घेता आला नाही.

१७) स्वातंत्र्योत्तर काळात बलात्काराचे प्रमाण वाढले आहे. शासकीय अधिकारी त्यात आघाडीवर आहेत.

१८) स्त्रीशक्तीस अद्यापही पाहिजे तसा सन्मान मिळालेला नाही.

१९) नवा मनू म्हणून म. ज्योतिबांचा उदय झाला.

२०) डॉ. बाबासाहेबांनी स्त्रीच्या पाठीराख्याची भूमिका घेतली.

२१) नवी स्त्री उदयास येते आहे.

थोडक्यात ह्या प्रबंधात वरील अभ्यास क्षेत्रातील लोकगीतांचा जास्तीत जास्त सर्वंकष व सूक्ष्म अभ्यास करण्याचा व त्या आधारेच वऱ्हाडी लोकभाषेचा व लोकसंस्कृतीचा आणि लोकजीवनाचा अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच लोकगीतांच्याच आधारे येथील स्त्रीजीवनाचाही वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. विदर्भातील समाजजीवनाचा शोध जास्तीत जास्त व्यापक आणि वास्तव करण्याचा हा प्रयत्न आहे.

❑

डॉ. प्रतिमा इंगोले

अ, ३१ नारायणनगर, दर्यापूर, जि. अमरावती ४४४ ८०३.

---

## स्वागत

- ❑ **आखाडा पेलताना :** ज्ञानेश्वर कोळी, वारणा कामगार प्रकाशन, पृष्ठे ६०
- ❑ **नवलकथा एका पुरुषार्थाची :** राजा मंगळवेढेकर, अभय फिरोदिया प्रकाशन, पुणे
- ❑ **शल्य त्या अधुऱ्या स्वप्नांचे :** चंद्रकुमार नलगे, प्रचार प्रकाशन, पृष्ठे १९८
- ❑ **रेघोट्या :** चंद्रकुमार नलगे, प्रियदर्शी प्रकाशन, पृष्ठे १६०
- ❑ **दसऱ्याचं नाटक :** चंद्रकुमार नलगे, प्रियदर्शी प्रकाशन, पृष्ठे १०८
- ❑ **दक्षिण देखणी यक्षिण :** चंद्रकुमार नलगे, मनोकामना प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २०८
- ❑ **झुळझुळ गाणी :** चंद्रकुमार नलगे, प्रचार प्रकाशन, पृष्ठे २८
- ❑ **मराठी विश्वकोश :** (रेल्वे ते वाद्य व वाद्यवर्गीकरण) : प्रमुख संपादक - तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई

---

## स्वागत

- ❑ **भंडाऱ्याचे गाव :** प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, पृष्ठे ३२
- ❑ **श्याम गाणे :** श्या. कु. ठाकरे, सोनल प्रकाशन, पृष्ठे ३२
- ❑ **आत्मघाताच्या कैफ वाटेवर :** चैतन्य माने, कोजागिरी प्रकाशन, पृष्ठे ५५
- ❑ **निवडक वि. रा. शिंदे :** संपादक - गो. मा. पवार, साहित्य अकादमी प्रकाशन
- ❑ **अग्निपंख :** अनु. माधुरी शानभाग, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७६
- ❑ **कलावंत आणि विचारवंत :** ज्ञानदा नाईक, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९२
- ❑ **मुंबई ज्ञात व अज्ञात :** यशवंत रायकर, राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३३
- ❑ **विनोदवृक्ष :** मधू पोतदार, मंजुल प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२०
- ❑ **शिक्षण : आनंदक्षण :** रमेश पानसे, युनिसेफ प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ३०६
- ❑ **अर्वाचीन मराठी काव्यदर्शन :** अक्षयकुमार काळे, पा. वा. बनहट्टी प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ८१५
- ❑ **डंख प्यालेलं अवकाश :** सुधीर रा. देवरे, लाखे प्रकाशन, नागपूर, पृष्ठे ७९
- ❑ **शिकारी :** सौ. शारदा तुंगार, रजत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १२२
- ❑ **नामुष्कीचे स्वगत :** रंगनाथ पठारे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे २११
- ❑ **उदाहरणार्थ कोसला :** वासुदेव सावंत, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे २८४
- ❑ **तुझ्या असण्या नसण्याच्या कविता :** प्र. म. कोपर्डे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ८१
- ❑ **क्रमणा :** डॉ. लक्ष्मण माधवराव शिवणेकर, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ५७
- ❑ **विजयनगरचा सम्राट् देवराज :** सदाशिव आठवले, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९४
- ❑ **एकच प्याला समीक्षा-पर्व :** विनायक गंधे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५९
- ❑ **जीवनयात्रा :** अनिकेत मंजुळ, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४
- ❑ **लेकुरवाळी :** शांता शेळके, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १३०
- ❑ **आपली संस्कृति :** स्वर्णलता भिशिकर व वा. ल. मंजुळ, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, १ ते ५ भागामध्ये,
- ❑ **आत्मभान :** डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ११२
- ❑ **वैज्ञानिक दृष्टिकोन एक अभ्यास :** शंभुनाथ कहोलकर, अभय प्रकाशन, नांदेड, पृष्ठे १४६
- ❑ **चुन्नी कत्योल :** दिगंबर कुलकर्णी, रेणुका प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २९०
- ❑ **ते कावळे म्हणाले :** दिगंबर कुलकर्णी, रेणुका प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे २२३
- ❑ **मातृभाषा मराठी चिंता आणि चिंतन :** डॉ. श्रीपाद जोशी, गोकुळ मासिक प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६
- ❑ **साहित्य समीक्षा आणि संवाद :** डॉ. रवींद्र ठाकूर, दिलीपराज प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३१८
- ❑ **भुकंप :** सौ. अर्चना वर्टीकर, चैतन्य प्रकाशन, पृष्ठे १३५

# म. फुलेंच्या विचारांच्या विविध पैलूंचा शोध

डॉ. मीरा घांडगे

महाराष्ट्र शासनाने १९९० मध्ये स्थापन केलेल्या 'म. फुले चरित्र साधने प्रकाशन समिती'च्या अनेक उपक्रमांमधून सिद्ध झालेला 'म. फुले : शोधाच्या नव्या वाटा' हा श्री. हरि नरके यांनी संपादित केलेले ग्रंथ. या समितीने प्रकाशित केलेल्या 'म. फुले गौरवग्रंथ' खंड - १, संपा. - हरि नरके व डॉ. य. दि. फडके (१९९१) या ग्रंथाचा दुसरा खंड 'महात्मा फुले : शोधाच्या नव्या वाटा' या शीर्षकाखाली प्रकाशित केला आहे.

आजवर म. फुले व त्यांचे वाङ्मय याच्यावर विपुल लेखन झालेले आहे. म. फुलेंच्या नावाबरोबर स्त्रीशिक्षण व दलितोद्धार या त्यांच्या महत्त्वाच्या कार्याची प्रकर्षाने जाणीव होते. पण तरीदेखील म. फुले यांच्यामधील अनेक वैचारिक पैलूंचा वेध घेणे ही आजही काळाची गरज आहे, ही गोष्ट संपादक श्री. हरि नरके यांनी जाणली. म्हणूनच कामगार नेता, कृषितज्ज्ञ, लोकचळवळींचा नेता, समाजनिष्ठ लेखक-पत्रकार, सामाजिक न्यायासाठी झटणारा, स्त्री-पुरुष समानतेसाठी झटणारा असे विविध पैलू उलगडून दाखविणारे लेख त्या त्या विषयावरील तज्ज्ञ व्यक्तींकडून लिहून घेऊन या संग्रहात संग्रहित केले आहेत.

धर्माचे मूळ तात्त्विक पातळीपेक्षा व्यावहारिक पातळीवर सामान्य जनात प्रस्थापित झालेले असते. त्यामुळे सामान्य जनांच्या जीवनात नवस-सायास, व्रतेवैकल्ये विधी यातून समाजाची धार्मिक मानसिकता घडलेली असते. ही संस्कृती बहुजनांकडून अभिजनांकडे संक्रमित झालेली असते. त्यातून बहुजन वर्गाचे आर्थिक दारिद्र्य, सामाजिक अधोगती आणि मानसिक दुर्बलता हा या बहुजन संस्कृतीचा पाया आहे, याची जाणीव म. फुल्यांना होती. म्हणूनच व्यक्तिस्वातंत्र्याची समानता असलेल्या समाजाची रचना म. फुलेंना अभिप्रेत आहे व भाषा, कला, धर्म, इतिहास यांच्या माध्यमातून फुले एक पर्यायी परंतु अस्सल भारतीय संस्कृती नव्याने उभी करतात हे डॉ. अरविंद देशपांडे यांनी दाखवून दिले आहे.

'समतेसाठी समतावादी पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानांचा संयोग हा फुलेंचा सर्वात मोठा कालातीत वारसा आहे' (पृ. २१) म. फुलेंचा पवित्र राष्ट्रवाद हाच खरा भारतीय राष्ट्रवाद आहे. या समतावादी राष्ट्रवादाची व त्याच्या अब्राह्मणी अन्वेषण पद्धतीची मुहूर्तमेढ रोवून म. फुलेंनी भारताला आजच्या धर्मसंकटातून सोडवणारा कालातीत वारसा दिला आहे. (पृ. २८) असे विचार महापंडित शरद पाटील यांनी मांडले आहेत.

संत तुकारामांचे अभ्यासक डॉ. सदानंद मोरे यांनी म. फुल्यांवर व त्याच्या अनुषंगाने सत्यशोधक ब्राह्मणेतर चळवळीवर कबीर व तुकाराम यांचा प्रभाव होता, एवढेच नव्हे तर 'फुल्यांचे काही अभंग (अखंड) आणि तुकोबांचे अभंग यांच्यात अंतर फक्त एका कार्बन

पेपरचे आहे' (पृ. ४६) इतके विलक्षण साम्य या दोन महालेखकांमध्ये आहे याचे कारण म. फुल्यांनी तुकोबांची गाथा पारायणे करून आत्मसात केलेली असणार म्हणूनच तुकारामांचे विचार मनात मुरले गेल्यामुळे म. फुल्यांचे व्यक्तिमत्त्व जहाल व धाडसी झालेले होते, असे डॉ. मोरे म्हणतात.

म. फुले ईश्वराचे अस्तित्व मानतात. त्यांनी ईश्वराचा द्योतक म्हणून 'निर्मिक' किंवा 'निर्मीक' हा नवीन शब्द तयार केला. ईश्वर हा प्राण्यांसह अखिल विश्वाचा निर्माता आहे, ही म. फुल्यांची धारणा होती. एकूण फुल्यांच्या धर्माचे स्वरूप हे ईश्वरसापेक्ष, परंतु मानवाधिष्ठित आहे, असे विचार डॉ. आ. ह. साळुंके यांनी व्यक्त केलेले दिसतात. म. फुल्यांची आदर्श राज्याची कल्पना क्रांतिकारी व विश्वकुटुंबकत्वाची होती, तर निर्मिकाचे राज्य ही एक अमूर्त कल्पना आहे व व्यवहारात त्याचा अर्थ आदर्श राज्य असा घ्यावा व त्यातून स्त्री-पुरुष समानता, बंधुता, व्यक्तिस्वातंत्र्य, नि:पक्षपातीपणा इ.सारख्या गोष्टींचा आंगिकार केला जाईल. त्यासाठी शुद्रांनी विद्या संपादन करून वर्ण-जातिभेदावर उभी असलेली ब्राह्मणशाही, सरंजामशाही रचना पूर्णपणे मोडून टाकावी असे म. फुले यांचे मत प्रा. औटी व चौसाळकर यांनी स्पष्ट करून दाखविले आहे. थोडक्यात शुद्रातिशुद्र व स्त्रिया यांच्यावरील ब्राह्मणशाहीचा जुलूम संपविण्यासाठी आवश्यक असणाऱ्या समाज परिवर्तनाचे राजकारण म. फुले यांनी मांडलेले होते.

जातिसंस्थाप्रणित विषमता आणि स्त्रीदास्याची ऐतिहासिक उपपत्ती यांचा शोध म. फुल्यांनी इतिहासाच्या साह्याने घेतलेले दिसतो. महाराष्ट्रातील मूळ परंपरेच्या (अब्राह्मणी) इतिहासाचे तीन संदर्भ म. फुल्यांनी बळीच्या इतिहासात शोधले व मांडले. म. फुल्यांच्या एकूण लिखाणातून व्यक्त होणारी वर्ग संकल्पना वर्गजातिसंस्थेतून जन्म पावलेली आहे. भारतीय इतिहासामधील भटशाही विरुद्ध शुद्रातिशुद्र असा जो संघर्ष त्यांनी मांडला आहे, त्याची भाषा वर्गजातिसंघर्षाची आहे, असे प्रा. उमेश बगाडे म्हणतात. तर डॉ. भा. ल. भोळे यांच्या मते म. फुल्यांची पत्रकारिता ही श्रेष्ठ दर्जाची होती. पंडिता रमाबाईंनी खिस्ती धर्माचा स्वीकार केल्याने पत्रकारांनी त्यांना दिलेल्या दुषणांवर म. फुल्यांनी तीव्र संताप व्यक्त केला. त्यापेक्षाही ताराबाई शिंदे यांच्या 'स्त्री-पुरुष तुलना' या निबंधावर दीनबंधूतून कृष्णराव भालेराव यांनी परखड टीका केली. त्यावर ज्योतीरावांचा आक्षेप असा होता की, क्षुद्र समाजात जन्माला आलेला हा पत्रकार सामाजिक अन्यायाबावत समदु:खी असलेल्या स्त्रियांच्या व्यथा समजावनू न घेता त्याबद्दल त्वेषाने लिहिणाऱ्या एका स्त्रीची टवाळी करतो हे अक्षम्य आहे (पृ. १३३) वर्तमानत्राचे श्रेष्ठ-कनिष्ठत्व, अज्ञान-विद्वता, सभ्य-असभ्यत्व, कुलीन-अधमत्व पारखण्याचा हा निकष ज्योतीरावांनी सांगितला तो सार्वकालीक व सार्वत्रिक आहे. (पृ. १३४)

सामाजिक न्याय, समता व बंधुत्व या तीन मूल्यांवर आधारित नवसमाज म. फुलेंना अभिप्रेत होता, असे त्यांच्या वाङ्मयातील इस्लाम, महंमद पैगंबर, महंमदी लोक इ. उल्लेखावरून दिसते. म. फुल्यांची 'निर्मिका'ची संकल्पना इस्लाममधील 'अल्लाह' संकल्पनेला जुळणारी आहे. हे 'म. फुले आणि इस्लाम' या लेखात अब्दुल कादर मुकादम यांनी दाखवून दिले आहे.

मनुष्य जातीला जन्म देणारी संगोपन संवर्धन करणारी स्त्री ही पुरुषापेक्षा श्रेष्ठ आहे पण स्त्रियांच्या दुय्यमत्वाची कारणे त्यांच्या शरीरधर्मात नसून पुरुषांच्या कावेबाजपणात आहेत, असे ज्योतीरावांचे मत आहे. एवढेच नव्हे तर जेव्हा ताराबाई शिंदे, पंडिता रमाबाई, आनंदीबाई जोशी, रमाबाई रानडे इ. सारख्या स्त्रिया आपले परखड विचार मांडू लागल्या त्यावेळी स्त्रियांना सर्व प्रकारचे न्याय, स्वातंत्र, समता मिळाली पाहिजे, असे मत म. फुल्यांनी मांडले असे डॉ. विद्युत भागवत सांगतात.

शेतकऱ्यांच्या प्रश्नाला म. फुल्यांनी अत्यंत व्यापक भूमिकेतून हात घातला. शेतकऱ्यांच्या वस्तुस्थितीचे चित्रण 'शेतकऱ्याच्या आसूड'मध्ये करून दिले आहे. वेठबिगार, धर्मव्यवस्था, कारभार, अपुऱ्या किमती हे सर्व शेतीच्या लुटीचे प्रकार आहेत. याची जाणीव झाल्यावर त्यांनी लुटीचा एक इतिहास आणि विचारपद्धती पुढे मांडली. थोडक्यात शेतीची लूट ही भांडवल निर्मितीचे साधन आहे, ही जाणीव ज्योतीरावांना स्पष्ट दिसते. (पृ. १९१-श्री. शरद जोशी)

म. फुल्यांच्या मते बळीचे राज्य हे लोकसत्ताक राज्य होते आणि त्याच्या लयाबरोबरच भारतातील लोकशाही परंपरा लयास गेली. (पृ. २००) त्यांच्या मते लोकशाही व देशाभिमान हे दोन गुण बळीराजाच्या परंपरेत मोठ्या प्रमाणात अस्तित्वात आहेत. महाराष्ट्रातील शेतकरी जमातींना बळी आणि परशुराम यांच्या कथेचा खरा अर्थ समजून सांगण्याचा जोतीरावांचा प्रयत्न होता. आपली परंपरा जीत क्षेत्रपद्धतीची परंपरा असून ती लोकसत्ताक परंपरा आहे, ही परंपरा क्षेत्रपतींनी जिवंत करावी असे त्यांचे मत होते. महाराष्ट्रातील क्षेत्रपती किंवा शुद्रातिशुद्र हे एकच आहेत. केवळ व्यवसायपरत्वे त्यांच्यात जातिभेद आहेत. पण हे सर्वच जण बळीचे उपासक आहेत, असे त्यांचे मत होते. (डॉ. चौसाळकर).

म. फुल्यांनी आपल्या लेखनातून विशिष्ट असे तत्त्वज्ञान मांडले नसले तरी समाजवादी धर्मनिरपेक्षता अथवा जातिविहीन एकात्म राष्ट्राची कल्पना म. फुलेंना अभिप्रेत होती. स्वातंत्र, समता, बंधुता ही म. फुलेंना अपेक्षित असलेली त्रयी होती. म. फुले 'मूलगामी समाज परिवर्तनाचे आद्य प्रवर्तक' होते. ज्ञानापासून वंचित असलेल्या शोषित व दलित जनतेला संघटित करणारा पहिला भारतीय दृष्टा असा परिचय प्रा. ल. भा. कुरकुटे करून देतात. जोतीरावांच्या कवितेत जाणीवेच्या व विचारांच्या पातळीवरची आधुनिकता आहे. त्यामुळे आधुनिक कवितेचे जनकत्व त्यांना बहाल करण्यात खरा न्याय आहे. असे प्रा. चोपडे म्हणतात. म. जोतीराव फुल्यांचे परमहंस सभेशी कसे जवळचे नाते होते हे डॉ. जे. पी. नाईक यांच्या लेखातून स्पष्ट होते. एवढेच नव्हे तर म. फुले जीवनाच्या पूर्वार्धात परमहंस सभेच्या विचारांशी संपूर्ण सहमत होते, हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

डॉ. य. दि. फडके यांनी डॉ. विश्राम रामजी घोले, रामचंद्र बापूशेठ उखणे, पोलास राजण्णा लिंगू आणि गंगाधरभाऊ म्हस्के, रामचंद्र विठोबा धामणस्कर, तुकाराम तात्या पडवळ, स्वामी रामय्या व्यंकप्पा अय्यावारू, व्यंकू बाळूजी कालेवार, जाया काराडी लिंगू, केशव शिवराम जोशी (भवाळकर), बाबा वडनाला, नारायण मेघाजी लोखंडे, कृष्णाजी पांडुरंग भालेकर, या जोतीरावांच्या सहकाऱ्यांचा परिचय करून दिला आहे.



अनुक्रमणिका

म. फुलेकालीन (ब्रिटिशकाळात) आधुनिक शिक्षणाचा लाभ उच्चवर्णियांना होत होता. पण शुद्रातिशुद्रांचे मानसिक दास्यत्व दूर झालेले नव्हते. मुंबईसारख्या औद्योगिक नगरीची भरभराट होत असतानाच ग्रामीण भागातून आलेल्या शुद्रातिशुद्रांचे शोषण केले जात होते. त्यांना शोषण मुक्त करण्याचे काम फुले-लोखंडे यांनी केले. (श्री. मनोहर कदम) सामाजिक सुधारणांच्या क्षेत्रात म. फुले, रा. शाहू व डॉ. आंबेडकर या तीन व्यक्तींची प्रामुख्याने नावे घेतली जातात. शाहूमहाराजांचा सत्यशोधक समाजाशी कधीच संबंध आला नाही असे काही विद्वानांचे मत असले तरी म. फुलेंच्या निधनानंतर मृतवत झालेली सत्यशोधक समाजाची चळवळ राजर्षी शाहू महाराजांच्या प्रेरणेनेच फोफावली व या दृष्टीने शाहूमहाराजांचा फुल्यांशी निकटचा संबंध आला याचे विश्लेषण डॉ. रमेश जाधव यांनी केले आहे. कोल्हापूरचे चौथे शिवाजी यांच्या प्रकरणात झालेल्या बदनामीच्या खटल्यात म. फुले यांचे सहकारी रामशेठ बापूशेठ उरवणे हे म. फुले यांच्या सांगण्यावरून जामीन राहण्यास पुढे झाले होते. तर या प्रकरणात टिळक-आगरकर तुरुंगातून सुटून आल्यावर म. फुल्यांनी त्यांचा सत्कार करविला लक्षात घेता फुल्यांचा टिळक-आगरकरांशी जवळचा संबंध होता, हे जाणवते.

म. फुल्यांवर विविध पातळीवर व विपुल प्रमाणात लेखन झाले असताना विषयातील तोच तो पणा टाळून व एकूणच म. फुल्यांच्या समग्र विचारांवर-साहित्यावर वेगवेगळ्या दृष्टीने प्रकाश टाकण्याचा प्रयत्न ग्रंथातील सर्वच लेखकांनी केला आहे. म. फुले यांच्या विचाराला एक वेगळी दृष्टी हा ग्रंथ देतो. म्हणूनच म. फुले यांच्या अभ्यासकांना हा ग्रंथ निश्चितच उपयोगी पडेल, असे वाटते.

□

महात्मा फुले : शोधाच्या नव्या वाटा,
महात्मा फुले चरित्र साधने प्रकाशन समिती, मुंबई, ४०० ०३२.
संपादक : हरि नरके

□

डॉ. मीरा घांडगे
अधिव्याख्याता, डॉ. बा. आं. मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.

---

## स्वागत

- □ **श्यामची आई - एक दर्शन :** डॉ. नसीन ए. देशमुख, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ४२
- □ **पताना :** लरारी कपडू मडावी, सौ. लता मडावी, पृष्ठे ७५
- □ **गुगली :** भारत सातपुते, प्रकाशिका सौ. सातपुते, लातूर, पृष्ठे ७४
- □ **हे तिरंगी झेंड्या :** भारत सातपुते, प्रकाशिका सौ. सातपुते, लातूर, पृष्ठे ९३
- □ **वावटळ :** प्रतिभा गाररकर, राजश्री प्रकाशन, पृष्ठे ९४

---

# व्यस्ततावादी रंगभूमीचा चिकित्सक अभ्यास

प्रसाद मणेरीकर

'आगळीवेगळी नाट्यरूपे' हे प्रा. रा. ग. जाधव यांचे नाट्यसमीक्षणात्मक पहिलेच पुस्तक. समग्र सांस्कृतिक (कलात्मक, सामाजिक, ऐतिहासिक इत्यादी) भानातून व आधुनिक बदलत्या परिप्रेक्ष्यातून समीक्षाविचार मांडणारे समीक्षक म्हणून प्रा. जाधव सर्वांना ज्ञात आहेत. विशेषत: स्वातंत्र्योत्तर कालखंड, या कालखंडातील बदलत्या जाणिवा, कलेमधून या जाणिवांचा होणारा आविष्कार, व्यक्ती, समाज, संस्कृती या सर्वांचा मागोवा व त्याची मीमांसा जाधव आपल्या समीक्षा विचारातून सतत करीत आलेले आहेत. या लेखसंग्रहातून आगळ्यावेगळ्या नाट्यरूपांच्या अनुषंगाने स्वातंत्र्योत्तर काळातील नाटक व त्याद्वारे आधुनिक माणसाचा, त्याच्या जगण्याचा, त्याच्या शारीरिक, मानसिक नातेसंबंधाचा, त्याच्या जगण्यातील व्यस्त जाणिवांचा, रूढ सुख-दु:खात्म जाणिवेच्या परिप्रेक्ष्यातून बाहेर पडून नवी दृष्टी शोधण्याचा आणि देण्याचा प्रयत्न जाधवांनी केलेला आहे.

या लेखसंग्रहातील अकरा लेखांमध्ये 'व्यस्ततावादी मराठी रंगभूमी', 'शोकात्म आणि विनोदात्म', 'मराठी संवेदनशीलता आणि नाटक' व 'दलित नाट्य व रंगभूमी' हे रंगभूमीविषयक विवेचनात्मक चार लेख तर 'महानिर्वाण', 'नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका', 'श्रीमंत', 'एक शून्य बाजीराव', 'सखाराम बाईंडर', 'वासनाकांड' व 'ब्रह्महत्या' या नाटकांवरील समीक्षणात्मक लेख समाविष्ट आहेत. हे बहुतांश लेखन व्यस्ततावादी मराठी रंगभूमीचा मागोवा घेणारे व त्या दृष्टीने नाट्यसमीक्षा करणारे आहे.

व्यस्ततावादी रंगभूमी (अॅब्सर्ड थिएटर) ही मुळात पाश्चात्य संकल्पना. मानवी अस्तित्वाचा शोध घेण्याची प्रवृत्ती या संकल्पनेच्या मुळाशी आहे. व्यक्तीचे अस्तित्व एका विशिष्ट जीवनातील सर्व घटक-घटनांचा संबंध तिच्या अस्तित्वाशी असतो. वरवर पाहता मानवी अस्तित्व ही सुलभ, सुकर धाग्यांनी आणि गाठी-सुरगाठींनी ती गुंतागुंतीची बनलेली असते आणि त्यामुळे मानवी अस्तित्वाचा शोधही तितकाच गुंतागुंतीचा बनला आहे. या मानवी वर्तन-व्यवहारांचा अर्थ लावणारी काही रूढ कार्यकारणादी साधनेही असतात. पण अशा प्रकारचे असे अस्तित्वाचे भान, त्याचा अर्थ लावणारी रूढ-पारंपारिक साधने नाकारणे म्हणजे व्यस्तता. जाधवांनीच म्हटल्याप्रमाणे 'व्यस्ततावाद म्हणजे अस्तित्व नाकारणे नव्हे तर त्याची रूढ परनिर्भरता नाकारणे व आत्मनिर्भरता स्वीकारणे होय... असे असले तरी मानवी अस्तित्व ही मनोवृत्ती नाकारत नाही, म्हणजे अस्तित्वाचे भान अव्हेरत नाही. ती अस्तित्वाचे रूढ आकलन व अनुषंगाने तशा रूढ आकलनाच्या प्रक्रिया व पद्धती

नाकारते. परिणामतः अस्तित्वाचे व्यस्त आकालन रूढ आकलनाच्या दृष्टीने वेगळे ठरते... मानवी अस्तित्वाच्या आशयाच्या व मूल्याच्या दृष्टीनेही व्यस्त जीवनधारणा निराळी ठरते...' अगदी एकान्तिक रीतीने सांगावयाचे, तर शून्याची पोकळ कल्पना भरीव मानण्याची आणि पंचभौतिक पर्यावरणाची भरीव कल्पना पोकळ मानण्याची ही व्यस्त मनोवृत्ती आहे.' (व्यस्ततावादी मराठी रंगभूमी, पृष्ठ ९-१०)

स्वातंत्र्योत्तर काळ हा विविध जाणिवांनी, घटना-घडामोडींनी प्रभावित आणि परिणामित झालेला काळ आहे. विशेषतः कनिष्ठ मध्यमवर्ग, मध्यमवर्ग व नवश्रीमंतवर्ग यांच्या जाणिवांमध्ये कौटुंबिक, सामाजिक वर्तनव्यवहारांमध्ये रीती-नीतींमध्ये सतत बदल होत गेले. नवकवितेतून, नवकादंबरीच्या विस्तृत पटावरून हे बदल मांडले जाऊ लागले. मराठी रंगभूमीनेही जास्त जवळून समाजाशी संवाद साधणारे असे जास्त सामुहिक माध्यम. अर्थातच व्यस्ततावद्ध जाणिवांचा आविष्कार मराठी नाटकांतून झाला. चिं. त्र्यं. खानोलकरांच्या 'एक शून्य बाजीराव' मधून त्याचे प्रथमदर्शन झाले.

'एक शून्य बाजीराव - एक विश्लेषण' या लेखाच्या सुरुवातीलाच जाधव म्हणतात — हे रंगचित्र म्हणजे आजच्या व्यस्तताबद्ध जाणिवांचे एक वेदनाचित्र आहे. हे व्यस्ततावादी वेदनाचित्र समजावून घेण्याचा स्वतः लेखकच या रंगचित्राद्वारा प्रयत्न करीत आहे. या प्रयत्नांतून अवघड असा संवाद उभा करावयाचा आहे' (पृष्ठ ७१) या नाटकातच दाखवलं जाणारं एक नाटक, या आतील नाटकाच्या बाह्य नाटकाशी असणारा संबंध, व त्याचा लौकिकाशी असणारा संबंध, नायक 'बाजीराव' याचा एक 'नट' म्हणून रंगमंचावर होणारा प्रवेश, त्याची 'विदुषकी' भूमिका त्याचं जगणं, त्या जगण्यातील शून्यता, या सर्वातून नाटकात दडलेले त्याच्या व्यक्तिजीवनाचे विरोधव्यंजक प्रहसन, व्यक्तिजीवनातील स्वत्व व स्वत्वाभास यातील विरोध, स्वत्वाच्या एकाच शून्यात जगण्याचा बाजीरावाचा असणारा अट्टाहास व त्यातून होणारी त्याची शोकांतिका जाधव या लेखातून समोर मांडतात.

मुळात खानोलकरांना या नाटकातून काय अभिप्रेत होतं? खानोलकरांनीच म्हटलंय : 'कोकणातील दशावतार कुठल्याही वडाच्या किंवा पिंपळाच्या झाडाखाली मुक्तपणे सादर केला जातो. अशी एखादी मुक्त शक्यता मला या नाटकातून अधोरेखित करायची होती... अनेक बिंदूंनी बनलेला एका रेषेचा जीवनमरणाचा संघर्ष उभारावयाचा होता आणि त्याचे मरण हा देखील एक विनोदी प्रकार म्हणून रंगमंचावर घडवायचा होता. शून्याकारात विलीन होतानाही बाजीराव विदुषकच ठरला. म्हणून तो 'एक शून्य बाजीराव.' (खानोलकरांचे नाटक डॉ. माधवी वैद्य. पृष्ठ ११ व १३) जाधवांनी मांडलेली व्यस्ततेची कल्पना खानोलकरांना मुळातच (जरी त्यांनी व्यस्ततावादाचा अभ्यास केलेला नसला तरी) अभिप्रेत होती. नाट्यसंहितेतून आणि आविष्कारातून त्यांना ती मांडायची होती आणि त्यांनी ती मांडलीही. अर्थात संहितेच्या दृष्टीने यशस्वी झालेले हे नाटक रंगभूमीवर यशस्वी का ठरले नाही? खानोलकरांनी अधोरेखित केलेली मुक्त शक्यता रंगभूमीला रुचली नाही काय? जाधवांनीही या संदर्भात काही उत्तरे

शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. विजय तेंडुलकरांच्या 'श्रीमंत' या नाटकाचे 'व्यस्त' आशयाचे स्पंदननाट्य' म्हणून समीक्षण करताना नाटकातून कुटुंबहीन व्यक्तीचे (श्रीधर) मिळणारे साहाय्य, कुटुंबसंस्थेच्या अंतर्गत असणारी व्यस्तबद्धता, एका कुटुंबसंस्थेचा होत जाणारा पराभव व त्याचवेळी नव्या कुटुंबसंस्थेची होणारी उभारणी या सर्वाचं विश्लेषण जाधव करतात.

जाधवांनी 'श्रीमंत' या नाटकाच्या (व पुढे इतरही नाटकांच्या) संदर्भात 'रंगचित्र' असा शब्दप्रयोग वापरला आहे. जेव्हा एखादे कुटुंबचित्र नाटकातून मांडले जाते, तेव्हा समाजातील अनेक कुटुंबचित्रांचे ते प्रतीक असते. अनेक कुटुंबचित्रे त्यातून प्रकट होत असतात. अशा प्रतीकरूप कुटुंबचित्राला रंगचित्र म्हणावे असे सांगतात. जाधवांनी 'श्रीमंत', 'वासनाकांड', 'ब्रह्महत्या', 'सखाराम बाईंडर' या सर्वच रंगचित्रांमधून व्यक्त होणाऱ्या कौटुंबिक नवप्रकृती शोधण्याचा व विश्लेषण्याचा प्रयत्न केलेला आहे.

'महानिर्वाण' या नाटकाच्या बाबत जाधवांनी 'कृष्ण सुखात्मिक' अशी संज्ञा वापरलेली आहे. ही संज्ञा इंग्रजीतील Dark Comedy या संज्ञेला पर्याय म्हणून वापरलेली आहे. 'डार्क' या विशेषणाचा अर्थ शून्यात्मकता, रिक्तता, पोकळीचे संवेदन, रित्या अवकाशाचे संवेदन असा किंवा या प्रकारचा असावा... अशा अंधारमय पोकळीचा, संवेदन शून्यवत करणाऱ्या शून्यतेचा निर्देश 'डार्क' किंवा 'कृष्ण' या शब्दाने केला जातो, असे मला वाटते. (पृष्ठ २३) या 'महानिर्वाण'चा एक विधिनाट्य (थिएटर ऑफ रिच्युअल) म्हणून विचार करताना या नाटकातील धार्मिक विधी व त्याची प्रतिकात्मता, एका बाजूला प्रेतसंस्कारांचे गांभीर्य व त्याच्या दुसऱ्या बाजूला त्याला छेद देणारा मानवी वर्तनाचा हास्यास्पद पण स्वाभाविक प्रतिसाद, प्राकृतिकता व सांस्कृतिकता यामध्ये असणारी विसंगती. याचा विचार ते मांडतात व म्हणतात की ही विसंगती 'प्रकृती आणि संस्कृती यांच्या दरम्यान जीवघेण्या यांत्रिक कर्मकांडाची सुखांतिका असते त्याच वेळी त्यातल्या जीवघेण्या अंतरायाची शोकांतिकाही असते.' प्रकृती व संस्कृती या दरम्यान असलेल्या कृष्णतेचा वेध जाधव घेतात तर एल कुंचवारांच्या 'वासनाकांड'ला 'एक विचारगर्भ नाटक' म्हणून संबोधताना या नाटकाला असणारी एक निश्चित वैचारिक भूमिका, विचारसूत्राच्या दिशेने जाणारा नाट्यकथेचा सांगाडा, त्यावर साधला जाणारा विचारसूत्राचा परिपोष, वासनाकांडचा चित्रण विषय, त्यातील कामसंबंध, बहीणभाऊ नात्याची पराभूत जीवनशैली, नाटकातून शोधला जाणारा व्यक्तीसंबंधाचा नवा अर्थ याची मीमांसा ते करतात. तर 'सखाराम बाईंडर'च्या बाबतीत तेंडुलकरांनी आपल्या लक्षणीय चिंतन-मननाचा घाट या नाटकाला लाभू दिला नाही, असं स्पष्टपणे नोंदवतात.

या व्यस्ततावादी आशयापासून वेगळे पण स्वातंत्र्योत्तर काळातील रंगभूमीचा मागोवा घेणारे व काही दिग्दर्शन करणारे तीन लेख या लेखसंग्रहात आहेत. एक - शोकात्म आणि विनोदात्म, दोन - मराठी संवेदनशीलता आणि नाटक व तीन - दलित नाट्य व रंगभूमी. मराठी नाटकांचा अलंकारिकतेकडे असणारा

कल, त्यातील अती शाब्दिकता, मराठी रंगभूमीवर सतत राहिलेला पश्चिमी नाटककारांचा प्रभाव, वास्तवाचा मर्मभेदी वेध घेण्यात कमी पडणारी मराठी नाटककारांची शक्ती, संगीत रंगभूमीच्या पुरस्कर्त्यांमध्ये असणारा सनातनीपणा, कल्पनाशक्तीची जाणवणारी मर्यादा आणि मुख्यत: हौशी रंगभूमीच्या खांद्यावर भार टाकून चालणारी मुख्य रंगभूमी अशा मराठी रंगभूमीच्या मर्यादा जाधवांनी 'मराठी संवेदनशीलता आणि नाटक' या लेखातून समोर मांडल्या आहेत तर 'शोकात्म आणि विनोदात्म' या लेखातून शोकात्माच्या संदर्भात 'विनोदात्म'चा विचार करताना 'शोकात्म'च्या संदर्भातील रूढ 'सुखात्म'ची मांडणी बदलून या दोहोतले खण्डनात्मक नाते शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. आणि 'विनोदात्म'चा त्यांना मांडलेला विचार केवळ मराठी रंगभूमीलाच नाही तर एकूण मराठी साहित्याला लागू ठरणारा आहे.

या लेखसंग्रहाच्या अखेरीला असणारा 'दलित नाट्य व रंगभूमी' हा लेख दलित रंगभूमीला तिच्या स्थिती-गतीचे भान आणून देणारा आणि तिला नेमकेपणाने दिग्दर्शन करणारा आहे. गेल्या १५-२० वर्षांत दलित रंगभूमी प्रभावीपणे समोर येत आहे. मुळातच दलित काव्य, आत्मचरित्र यामध्ये एक संवादकला (परफॉर्मन्स) आहे. ही रंगभूमीला उपयोगी ठरणारी आहे. काव्य व नाटक यातील सांधा जोडण्याची दलित रंगभूमीत असणारी शक्ती, दलित साहित्याला आवश्यक असणारा श्रेष्ठ सुखात्मिकांचा विरंगुळा हे सर्व स्पष्ट करीत जाधव म्हणतात, 'मराठीत शेक्सपिअर निर्माण करण्याची क्षमता दलित नाट्य-प्रतिभेत संभवते.'

जाधवांनी व्यस्ततावादाची मांडलेली संकल्पना ही सुख-दु:खाच्या रूढ कल्पनांच्या पलिकडे जाणारी आहे. पण तरी ती नेमकी कशी आहे? या व्यस्त आशयाच्या नाटकांवरून, या नाटका संदर्भातील जाधवांनी केलेल्या चर्चेवरून असा प्रश्न निर्माण होतो की व्यस्ततावादाच्या या संकल्पनेचा शेवट शोकांतिकेच्या आसपास असतो काय? का व्यस्ततावादातून रूढ शोकात्म-सुखात्म-(विनोदात्मही) जाणिवेच्या पलिकडे लेखसंग्रहातील काही विधानांच्या आधारे हे स्पष्ट करता येईल.

१) 'ती प्रकृती आणि संस्कृती यांच्या दरम्यान साठलेल्या यांत्रिक कर्मकांडाची सुखात्मिका व त्याचवेळी त्यांच्यातील जीवघेण्या अंतरायाची शोकत्मिकाही असते. (महानिर्वाण - ३५)

२) गांभीर्याच्या लाटेवर सतत तरंगत राहणारे स्पंदननाट्य अखेर प्रक्षोभाच्या एखाद्या खडकावर आदळून फुटते... हा खडक शोकात्मिकेच्या किनाऱ्याच्या आसपास असतो काय? (श्रीमंत - ७०)

३) खऱ्याखुऱ्या जीवनमरणाशी ही शोकांतिका निगडीत झाल्याचे प्रत्ययास येते. (एक शून्य बाजीराव - ८३)

४) तर 'सखाराम बाइंडर हे कुठेतरी शोकत्मिकेच्या आसापास पोहोचले असते' (सखाराम बाइंडर - ९१)

५) यातील नायक नायिकेचा अंत मनाला विषण्ण करीत असला, तरी शोकात्मिकेचा प्रत्यय तो देऊ शकत नाही. (वासनाकांड - १०५)

'नाटक हा समकालीन वास्तवाचा आरसा असतो (ब्लर्व) असे जर आपण मानत असू

तर मूळात समकालीन वास्तव समजून घेणे भाग ठरेल. हे समकालीन वास्तव मुळातच सुख-दु:खात्म अनुभवांनी, माणसाच्या अस्तित्वाच्या, जगण्याच्या (आणि मरण्याच्याही) परस्परांतील नातेसंबंधांच्या प्रश्नांनी पुरेपूर भरलेले आहे. मानवी वर्तनव्यवहारांवर वर्तन व्यवहारांच्याच व्यस्त जाणिवा मूलभूत परिणाम करीत आहेत. या जाणिवांना व त्याच्या परिणामांना मनुष्यप्राणी बाजूलाही ठेवू शकत नाही व त्यापासून स्वत:ही बाजूला जाऊ शकत नाही आणि यातच सुखाचे काही क्षण वाट्याला येत असले तरी (आणि म्हणूनच) दु:खात्म जाणिवा जास्त परिणामकारक ठरत आहेत. आणि कोणत्याही काळात सुखात्म प्रत्ययापेक्षा दु:खात्म प्रत्यय माणसाला जास्त जवळचा वाटणारा आहे. त्यामुळेच व्यस्तनाट्य सुख-दु:खाच्या ऐल-पैल तटादरम्यान हिंदकळत असले तरी त्याची लाट दु:खात्म तटाच्या जास्त जवळ जाणारी असावी.

या लेखसंग्रहाच्या अनुषंगाने गेल्या अर्धशतकातील व्यक्तीचा त्याच्या कौटुंबिक-सामाजिक जीवनाचा, त्याच्या सुख-दु:खांचा, त्याच्या व्यस्त जाणिवांचा एक जाधवांनीच म्हटल्याप्रमाणे - 'नाट्यात्म विचारव्यूह' समोर येतो. लक्षात राहतो. कवी मर्ढेकर व नाट्य आणि संगीतिका लिहिणारे मर्ढेकर हे ... समोर येतात. मराठी नाटक, त्याची अर्धशतकी वाटचाल, या वाटचालीतील त्याची गवसणी आणि मर्यादा, दलित रंगभूमीविषयक नवे भान या लेखसंग्रहातून समोर येते. आणि यापुढे नाटकाला आणि प्रेक्षकालाही केवळ सुख-दु:खात्म केवळ कृष्ण-धवल भान पुरेसे नाही तर नवी 'आगळीवेगळी' दृष्टी शोधण्याची जाणीव हे पुस्तक करून देते.

'आगळीवेगळी नाट्यरूपे'
प्रा. रा. ग. जाधव
प्रकाशक - नवीन उद्योग, पुणे.
पृष्ठे १२१, किंमत रु. ११०/-

□

प्रसाद मणेरीकर
११३ अ, शनिवार पेठ,
चिरमंगल अपार्टमेंट, पुणे ४११ ०३०

---

## स्वागत

- □ **नाट्यलेखन :** मृणालिनी शहा, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे, पृष्ठे २८४
- □ **खसखस आणि खुसखुस :** दीपा गोवारीकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १७५
- □ **कंदीलाचा उजेड :** वसंत केशव पाटील, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५१
- □ **स्वातंत्र्योत्तर लावणी वाङ्मय :** विजय आहेर, प्रतिमा प्रकाशन, पुणे,पृष्ठे १५१
- □ **स्वातंत्र्य कुणाची दारी :** शंकरराव खरात, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १५०
- □ **अबोली :** शीलवती बावकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९०
- □ **भारताच्या साहित्याच्या इतिहासातील समस्या :** डॉ. रामविलास शर्मा, अनु. दत्तात्रय पुंडे, पद्मजा घोरपडे प्रतिमा प्रकाशन, पृष्ठे ११२
- □ **वात्रटिका :** मंगेश पाडगावकर, मौज प्रकाशन, मुंबई

**स्वागत**

- **हुतात्मा गोळसालगे गासिया :** जोसेफ तुस्कानो, प्रकाशनविश्व, पुणे, पृष्ठे ३२
- **माझ्या सार्वजनिक जीवनाची बखर :** शरश्चंद्र गोखले, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३६२
- **अभिनय :** ज्ञानेश्वर नाडकर्णी, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे ३२०
- **बावडी :** अंजली नरवणे, श्री विद्या प्रकाशन, पुणे, पृष्ठे १८०
- **सावित्री :** ग. ना. जोशी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४६४
- **अमृताहुनी गोड :** ग. ना. जोशी. चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे ५८
- **गुरुदेवाची गीतांजली :** ग. ना. जोशी, चेतश्री प्रकाशन, अंमळनेर, पृष्ठे २२५
- **सानेगुरुजींचे अंतरंग :** ग. ना. जोशी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे २२८
- **सानेगुरुजींचे तत्त्वचिंतन :** ग. ना. जोशी, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १०९
- **खोप्यातील परिसर :** प्रा. भगवान पाटील, तुलसीराज प्रकाशन, जळगाव, पृष्ठे ९०
- **सुखी माणसाचा सदरा :** मधुकर कुलकर्णी, श्रीसाई साहित्य, खोपोली, पृष्ठे ७७
- **तिरंगा ते भगवा :** जगदीश देवपूरकर, कविता प्रकाशन, धुळे, पृष्ठे ८८
- **अंत:स्तोत्र :** वसुंधरा तारकर, संहिता प्रकाशन, पृष्ठे ८०
- **निवडक माणूस :** श्री. ग. माजगावकर, माणूस प्रतिष्ठान, पुणे, पृष्ठे ६११

---

# काव्यानंद

अंजली कुलकर्णी

### *संमिश्र चेहऱ्याची कविता*

*कवितेच्या सर्व काळांमध्ये सगळ्या प्रकारच्या रंगछटा, गंधरेषांनी समृद्ध झालेली कविता पहायला मिळते. जीवनवादी आणि कलावादीकला हे दोन्ही प्रवाहसुद्धा बऱ्याच वेळा एकाच वेळी समांतरपणाने वाहताना दिसतात. कधी हा प्रवाह जोरकसपणाने मुसंडी मारतो तर कधी तो.*

*आतादेखील मध्यंतरीच्या काळात, दलित जाणीव, स्त्रीजाणीव यांकडे खेचला गेलेला कवितेचा झुला पुन्हा एकदा रोमँटिक भावकवितेकडे झुकू लागलेला दिसतो आहे; आणि दोन्ही प्रवाह पुन्हा एकदा समांतरपणे निखळ झुळझुळू लागल्याचे जाणवते आहे. जीवनवाद आणि कलावाद व मनुष्यजीवन आणि कलाजीवन ही दोन्हीही एकमेकांच्या हातात हात घालून साहचर्याने विकास पावत आहेत, याच्या खुणा दाखवणाऱ्या काही जुन्या प्रस्थापित तर काही नव्या कवींच्या संग्रहांचा येथे विचार करू या.*

### 'माझी पावले - माझ्या दिशा' - धारदार स्त्रीजाणीव

गेल्या काही वर्षांत स्त्रीजाणिवेचा समर्थ उद्‌गार मराठी कवितेमध्ये उमटतो आहे. या जाणिवा समृद्ध आणि सुस्पष्ट करणाऱ्या काही मोजक्या कवयित्रींमध्ये डॉ. अश्विनी धोंगडे यांचे नाव प्रामुख्याने घ्यावे लागते. त्यांच्या 'स्त्रीसुक्त' या पहिल्याच संग्रहाने या संदर्भात एक स्वतंत्र मुद्रा स्त्रीवादी कवितेवर उमटविली. त्यानंतरच्या 'अन्वय' या संग्रहानंतरच्या 'अपौरुषेय' या तिसऱ्या कविता संग्रहामध्येसुद्धा याच जाणिवा अधिक धारदारपणे व्यक्त झाल्या आहेत.

कवितासंग्रहाचे 'अपौरुषेय' हे नावच प्रथमतः लक्ष वेधून घेते. अपौरुषेय म्हणजे ज्याचा कुणी कर्ता विशिष्टत्वाने माहित नाही, तरीसुद्धा जे वाङ्मय सर्वदूर आहे असे. वेदांना 'अपौरुषेय वाङ्मय' म्हटले जाते. या संग्रहाच्यां संदर्भात त्यांनीच सुरुवातीला म्हटल्याप्रमाणे हा आवाज साऱ्या स्त्रीजातीचा आहे, फक्त कवीचा (कवयित्री असे वेगळे स्त्रीकवीला संबोधणे डॉ. धोंगडे यांनी नाकारले आहे. स्त्री असो वा पुरुष. कवी हा कवीच असतो म्हणून कवयित्री शब्द टाळला आहे.) नाही.

परंतु 'अपौरुषेय' आवाज असेल तर विशिष्ट नाव, गाव असलेल्या ग्लॅमर असलेल्या निशिगंधा वाड या अभिनेत्रीचा फोटो मुखपृष्ठावर टाकण्यामागचे प्रयोजन मात्र समजू शकत नाही.

बाई म्हणजे साड्या, दागिने, सोनेनाणे, प्रसाधने किंवा बाई म्हणजे भांडी-धुणी किंवा बाई म्हणजे नुसते शरीर — हे सगळे नाही तर बाई त्या पलीकडे काही आहे. तिला एक मन आहे, मनावर बुद्धीची धार आहे, पंख आहेत, भरारी घेण्याची क्षमता आहे, परंतु अहंकाराने आंधळे झालेले पुरुष तिच्या खऱ्या 'स्वरूपाकडे बघायला तयारच नाहीत. त्यांना त्यांच्या डोळ्यांना, बुद्धीला जसे बाईचे चित्र दिसते, तसेच ते आहे असे ते समजत आहेत आणि तसेच बाईने रहावे अशी अपेक्षा करीत आहेत.

इतके दिवस बाईलादेखील आपण पुरुषाच्या मनातली स्त्री आहोत, असेच वाटत होते. त्याच्या पेक्षा वेगळे वाटले तरी तसेच राहण्यावाचून पर्यायच नव्हता. परंतु, आज मात्र तिचे भान जागृत झाले आहे. तिला स्वत:चे स्थान, स्वत:चे अस्तित्व याचे लख्ख ज्ञान झाले आहे. तिने पुरुषाच्या आंधळ्या डोळ्यांना दिसणारी स्त्री म्हणून जगायचे नाकारले आहे. 'सात आंधळे एक बाई' या कवितेत हे नाकारणे लखलखीतपणे व्यक्त होते.

'मी आहे, मी सुद्धा आहे, मी सुद्धा कोणीतरी आहे' हे ठामपणे सांगणारी, आत्मविश्वासाचे तेज लाभलेली स्त्रीप्रतिमा डॉ. धोंगडे यांच्या कवितांमधून तेजधार उपरोधाच्या शैलीतून साकार झाली आहे. उदा. -

*'माझे हात माझे दिवे आहेत*
*माझी पावले माझ्या दिशा'*

'तुझे आभाळ आहे माझ्याविना तोकडे' असे म्हणणाऱ्या पुरुषवादी प्रवृत्तीला त्यांच्यातील स्वसामर्थ्याची जाणीव झालेली कवी सांगते आहे की -

*'मीच माझी वाट आहे,*
*निरुंद वाटेवर तोल सांभाळत जाईन*
*आणि आलीच दरी तरी*
*झोकूनही देईन अंधारात'*

एवढ्यावरच त्या थांबत नाहीत. पुढे त्यालाच त्या म्हणतात,

*'पहा, तुम्हालाच माझ्या पाऊलखुणा शोधत*
*इथवर येता आलं तर*
*इथलं मुक्त वारं सोसलं तर,'*

स्वातंत्र्याचे, मुक्तीचे वारे किती आनंददायक आहे, याचा अनुभव घेतानाच या कवीला वाटेत पावले रक्ताळतील, काटे रुततील याचेही भान आहे, जबाबदारी पेलण्याची जिद्दही आहे, आणि

*'जिथवर मी आले आहे*
*तिथे खरं तर मी एकटी आहे'*

हे देखील जाणवलं आहे हे महत्त्वाचे.

'अपौरुषेय' डॉ. अश्विनी धोंगडे
श्री विद्या प्रकाशन, पुणे.
पृष्ठे ८७, मूल्य रु. ७५/-

□

### भावकवितेच्या पातळीवर उतरलेले सामाजिक भान

'वाळवीची कुळे' हा भगवान ठग यांचा सहावा कवितासंग्रह. उपरोधिक, मर्मभेदक शैलीमधील, बांधेसूद प्रभावी मुक्तच्छंदामधील या संग्रहातील कविता निश्चितपणे एक दर्जा गाठताना दिसतात. स्वत:शीच पुटपुटत रहावे तसा एका संज्ञाप्रवाही शैलीतून कवितेचा हा एकसारखा ओघ वाहतो आहे.

आजच्या भ्रष्ट वैचारिक जीवनावर विचावंत, कवी, अध्यात्मवादी, कृतिशून्य प्रज्ञावंत यांच्यावरील आक्रमक रोख आणि अशा जीवनाच्या दर्शनाने सतत उन्मळून पडण्याचा अनुभव हा या कवितेमध्ये उत्कटपणे अभिव्यक्त झाला आहे.

'संकल्पनांच्या चिंध्यांचा चेंडू करून
'धबाकुटी' खेळणाऱ्या विचारवंतांचा वर्ग
या राष्ट्रात निर्माण झाला आहे'
किंवा
'इथल्या व्यवस्थेत काहीही होऊ शकतं
अध्यात्माच्या पुरातन वस्त्रांत
व्यवस्थित बांधता येतो
पृथ्वीचा अज्ञात विध्वंस'

इतक्या तीव्रतमपणे या आक्रमकतेला तोंड फुटते. विचारांच्या भ्रष्टाचारावर कोरडे ओढताना भगवान ठग म्हणतात -

'अनर्थसूचक विचारांनी सर्वत्र
माजला आहे कहर
कवींची हृदये ओस पडली आहेत'

आजच्या व्यवस्थेत कवी, विचारवंत, तत्त्वज्ञ, धर्मज्ञ सारेच षंढ ठरत असल्याची आणि मानवी समाजाच्या हितासाठी काहीही करण्यास असमर्थ असल्याची, चांगल्या व्यवस्थेला जन्म देण्यास असमर्थ असल्याची पोखरणारी, उदास जाणीव अनेक कवितांमधून व्यक्त झाली आहे.

ही जाणीव व्यक्त होताना ती व्यामिश्र अशा प्रतिमांकित भाषेत उमटते. परंतु प्रतिभा या प्रतिमा म्हणून कृत्रिमपणे न येता, कवितेचा, अनुभवाचा अविभाज्य भाग म्हणून येतात. म्हणून त्या बाहेरून चिकटवल्यासारखं वाटत नाहीत. प्रतिमांची अपरिहार्यता जाणवते तरीसुद्धा काही ठिकाणी कविता शब्दबंबाळ किंवा प्रतिमावंबाळ होते.

वास्तविक पाहता ही कविता सामाजिक आशयाची म्हणता येईल, नव्हे तशी ती आहेच. परंतु, ती भावकवितेच्या पातळीवर उतरते ती त्यातील अनुभवनिष्ठ अभिव्यक्तीमुळे. आपल्या मानवी संस्कृतीविषयी, मानवी जीवनाविषयी, त्यातील मूल्यात्मकतेविषयी वाटणारी अपार चिंता त्यांना अस्वस्थ करते. कारण समाजात वाळवीची कुळागरे जोमाने फोफावत आहेत आणि सारेच चांगले ही वाळवी वेगाने फस्त करत सुटली आहे, हा त्यांचा अनुभव आहे.

*'कुठेही शिरते*
*वाळवीचे सैन्य*
*फोफावते दैन्य*
*रक्तामध्ये'*

आणि या वाळवीच्या प्रभावाखाली गंभीरपणे जगण्या, लिहिणाऱ्या कवींची सुद्धा वाताहात होते. आजच्या दैन्यपूर्ण सांस्कृतिक जीवनाचे मर्मभेदक चित्रण 'कुसुमाग्रज - एक संवाद' या कवितेत आहे :

*'तुमचं एक निभून गेलं*
*तुमच्या पूर्वीच्या केशवसुत*
*मर्ढेकरांचीही जमून गेली भट्टी'*

आणि आज मात्र अशी अवस्था आहे की -

'कवितासंग्रह काढायला पैसे नाहीत
कवितेला लोक दूर लोटतात, समाज नाकारतो
बायको छळत राहते... समीक्षक चेकाळतात
डोळा विकावा कवितेसाठी तर
गिऱ्हाईकही फिरकत नाहीय'

अंतर्मुख करणारा हा कवितासंग्रह

कलात्मकतेची एक उंची निश्चित गाठतो.

'वाळवीची कुळे'
भगवान ठग
'तुका म्हणे प्रकाशन',
पृष्ठे ७६, मूल्य रु. ६५/-

□

## उत्कटता आणि संयम यातील सुरेख तोल

संगीता बर्वे हे नाव कवितेच्या क्षेत्रात त्यांचा 'मृगतृष्णा' हा प्रथम कवितासंग्रह येण्याअगोदरच परिचित झाले आहे ते वेगवेगळ्या कविसंमेलनांमधून त्यांची कविता ऐकल्यामुळे. एक प्रकारचे शांत, समंजस प्रौढपण संगीता वर्वे यांच्या कवितांमधून आधीच जाणवले होते, त्याची साक्ष कवितासंग्रह वाचताना पटली.

या संग्रहामध्ये निसर्गसान्निध्य, त्याची वेगवेगळी रूपे आणि निसर्गामुळे मनाच्या होणाऱ्या विविध भावावस्था टिपणाऱ्या काही कविता, काही कविताविषयक कविता आणि काही भेटलेल्या, गांजलेल्या बायकांविषयी कवयित्रीच्या मनात उमटणाऱ्या आंदोलनांच्या कविता आहेत. त्यांमध्ये लक्ष वेधून घेतात त्या कवितांमध्ये चित्रीत झालेल्या बायका.

डॉक्टरी व्यवसायामुळे, दारिद्र्याने, अज्ञानाने, अत्याचाराने अन् रोगांनी पिडलेल्या बायकांशी त्यांचा पेशंट म्हणून संबंध येतो. या बायकांकडे केवळ शरीराचा रोग बरा करणारी डॉक्टर यापलीकडे जाऊन तिच्या जगण्याविषयी विचार करणारी, अंतर्मुख होणारी आणि या बायकांमधले आणि स्वतःमधले नाते आत्मियतेने शोध घेणारी संवेदनाक्षम कवयित्री या कवितांमधून व्यक्त झाली आहे. उदा.

*'पण ही फिकी पडलेली*
*इवल्या चणीची पोर*
*असा अंधारमाखला हात धुऊन*
*ऐटीत कमरेवर हात ठेऊन*
*हसूही शकते की विनघोर'*

यानंतरचा दुसरा गट आहे कविताविषयक कवितांचा

'कवितेच्या मी करवंदी जाळीत अडकले पुरती सुटू कशी? सुटणार कशी?'

असे म्हणणाऱ्या संगीता वर्वेंच्या आयुष्यातील कवितेचे स्थान एखाद्या जवळच्या प्राणप्रिय सखीसारखे आहे. ती अगदी साधीभोळी, सरळ, अनलंकृत पण मनाचे दार उघडून आत शिरली अन् मनाच्या आत घरपण आले अशी नुसत्या भावनेच्या रसाने टवटवीत होणारी कविता मन भरून उगवते तेव्हा देहाचे शांतवन करते हा अनुभव उत्कटपणे व्यक्त झाला आहे.

संगीता बर्वेची काव्यशैली, सुलभ, सरल, प्रसन्न आहे. आविष्कृतीमध्ये उत्कटता आणि संयम यांचा एक सुरेख तोल साधला गेला आहे. मनाच्या तळापासून काहीतरी कळमळून येतेच. परंतु ते नुसत्या भाबड्या दयेने वाहून जात नाही.

या संग्रहाचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे संगीता बर्वेचे छंदावर असलेले प्रभुत्व. विविध छंद त्यांनी चपखलपणे वापरले आहेत. त्यातील सफाई मोहक आहे. परंतु, छंदातून येणारा आशय हा काहीसा सपक आणि पारंपारिक वळणाचाच झाला आहे. नवा आशयही छंदातून लिहिता येण्याइतकी क्षमता असताना कविता सांकेतिक होते.

उदा. 'गरुड होऊनी आभाळातुनी उडायचे

मज आहे' या ओळी सफाईदार छंदातून आल्यामुळे गोड वाटतात. पण नवे काही देत नाहीत.

तरीसुद्धा,

*'बुडू लागला सूर्य जरासा*
*पुळणीवरले पाय खेचले*
*अथांगतेच्या प्राणभयाने*
*पुन्हा नकोसे मीपणा स्मरले'*

यांसारख्या ओळी चांगला आशय छंदोबद्ध करतात.

'स्त्रीत्वासाठी', 'सतीचे मनोगत'सारख्या कवितांमधून अधिक खोल शोध घेता आला असता असे वाटते.

'शतकांच्या शिळा', 'वाळवी', 'युद्धभूमीवर येईन' या कविता विलक्षण वेगळा अनुभव देतात ज्या संग्रहाची उंची वाढवितात.

'मृगतृष्णा'
संगीता बर्वे
पद्मगंधा प्रकाशन, पुणे.
पृष्ठे १०३, मूल्य रु. ७०/-

□

## 'रूटीनत्व' अधोरेखित करणारा प्रगल्भ मुक्तछंद

मनीषा दीक्षित यांचा 'रेतीवरल्या रेघा' हा पहिलाच कवितासंग्रह खूप अपेक्षा निर्माण करणारा आहे. श्री. पंडित आवळीकरांनी प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे 'प्रगल्भ' परंतु 'प्रसन्न' नव्हे तर भेदक दाहक अनुभव देणारा आहे.

या संग्रहातील जवळजवळ प्रत्येक कविता ही प्रतिमेने सुरू होते आणि संपते. त्याबाबत वरवर परस्पर विरोधी वाटतील असे दोन मुद्दे मांडता येतील. एकतर अचूक नेमकेपणाने सापडलेले आशयसूत्र व्यक्त होताना मात्र विनाकारण धूसर होते. प्रतिमा लक्ष वेधून घेतात, गुंतवतात आणि आशय मागेमागेच राहतो. प्रतिमा बहुतांश घरगुती आयुष्यातल्या, दैनंदिन त्यातही स्वयंपाकघरातल्या जास्त. उदा. 'मिक्सरचे बटन ऑन करावे' किंवा 'मळलेले कपडे बुडवून ठेवावेत फेस केलेल्या साबणाच्या पाण्यात' किंवा 'मुरवत ठेवावे स्वत:ला सर्जनशील द्रावणासारखे, सुगरणीच्या हातच्या मोरवळ्यासारखे' किंवा 'वर्तमानपत्रवाल्याने दाराखालून सरकावावा पेपर इतक्या सहज आले तसे निघून गेले दिवस' आयुष्य, दिवस, मन यांच्यासाठी 'रूटीनत्व' सूचित करणाऱ्या या प्रतिमा. या साऱ्याच प्रतिमा घरात गृहिणीला रोजरोज उरकाव्या लागणाऱ्या घरकामामधल्या. त्यामुळे कदाचित अनुभव विश्वाच्या मर्यादा चौकटीबद्ध होत असल्यासारखे वाटते. परंतु, त्याबरोबरच किंबहुना त्यामुळेच त्या प्रकारच्या आयुष्यातील एकारलेपण, चाकोरीपण, विटलेपण, कंटाळवाणेपणही अधोरेखित होते, हा या प्रतिमांचा आणि कवितांचा विशेष गुण आहे.

मर्ढेकरांनी ज्याप्रमाणे यंत्रवत् आयुष्यातील निरर्थकत्व समर्थपणे व्यक्त केले, त्याच पद्धतीने आयुष्यातील चाकोरी, जी प्रत्येक एका दिवसाला नंतर किंवा आधीच्याच दिवसाची कॉपी असल्याप्रमाणे वाटावी, एक किंवा दुसरा दिवस यात काहीच फरक, विशेषत: जाणवू नये आणि एक दिवस काय किंवा आख्खे आयुष्य काय, जगण्याने त्यात काहीच फरक पडू नये अशा प्रकारचा एक बुरशी चढलेला निरर्थकत्वाचा थर अंगाखांद्यावर वागवत जगणे 'जिणे' होऊन

जावे अशा प्रकारचा अनुभव व्यक्त झाला आहे.

संवेदनांच्या आतल्या अंगातील सूक्ष्म, दुखऱ्या जागा शोधताना

*'हस्तेरेषा तशाच...*
*भविष्याच्या मुठी*
*उघडायच्या ठरवल्या तरी*
*मिटवायच्या ठरवल्या तरी...'*

अशा प्रकारचे अटळपण ठसठसत राहते. आणि तरीदेखील

'माणसाने माणसावर करत रहावे प्रेम' यांसारखे चिवट, आसक्त, आशावादी मन कवयित्रीला लाभले आहे, हे केवढे मोठे भाग्य आहे. आयुष्याला तिखट, आंबट, तुरट, गोड कशाही पद्धतीने स्वीकारण्याइतका समंजसपणा कवयित्रीमध्ये आला आहे. तो

*'आता भोवळ आली तरी थांबता येत नाही*
*नि उत्कर्षविंदू गाठला तरी*
*आभाळाला हातही लागत नाही'*

या भेदक सत्याचे दर्शन तिला झाले आहे म्हणूनच.

पहिलाच संग्रह असूनही मनीषा दीक्षित यांच्या रचनेतील सफाई चांगल्या मुक्तछंदाच्या वापरातून जाणवते. मात्र प्रतिमांचा सोस टाळायला हवा.

'रेतीवरल्या रेघा'
मनीषा दीक्षित
कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे
पृष्ठे ८३, मूल्य रु. ६०/-

□

**अनेकविध अनुभवांना दिलेला भावूक प्रतिसाद**

'रंग जीवनाचे' हा श्री. विजय कुलकर्णी या नवोदित कवीचा पहिलाच कवितासंग्रह आहे. संग्रहात नवखेपणाच्या खुणा जागोजाग आढळतात. प्रस्तावनेत हेमा लेले यांनी म्हटल्याप्रमाणे 'अनेक प्रतिक्रियांनी त्यांचे मन व्यापले आहे' या संग्रहातील कविता म्हणजे जगताना भेटलेल्या अनेकविध अनुभवांना, विचार, भावनांना दिलेला भावूक प्रतिसाद आहे.

बालपणापासून, 'आई'सारख्या जीवनातल्या अत्यंत जिव्हाळ्याच्या देव्हाऱ्यापासून, प्रीति, स्त्रीशक्ती, पुढारी, मंत्री, सामाजिक-राजकीय प्रश्न, निसर्गाची भावरूपे, जीवनाचे तत्त्वज्ञान, आठवणी, स्मृतीजतन आणि अगदी कविताविषयक 'चिंतन' देखील.... इतके सारेच रंग या कवितासंग्रहामध्ये कवितेचे विषय झाले आहेत आणि कविता या विषयांमध्ये रमलेली दिसते.

पारंपारिक वळणाने सांकेतिक आशय बालकाच्या निरागस अजाणतेपणाने व्यक्त झाला आहे, तो आजच्या, शहरांमधून प्रचंडपणाने वाढ पावलेल्या सांस्कृतिक जीवनाचे प्रतिबिंबच दाखवितो.

या कवितांमध्ये महांबरे यांनी म्हटल्याप्रमाणे पूर्वसूरींचे अनुकरण नाही (महांबरेंचा शब्द 'अंधानुकरण') परंपरेचा परिचय करून घेणे, ती पचनी पाडणे आणि त्यातून स्व:चा स्वतंत्र अनुभव, भाषा, व्याकरण, छंद, अलंकार, जगण्याविषयीचा दृष्टिकोन आणि अन्वय विकसित करीत नेणे एवढ्या मोठ्या जटिल प्रवासात कविता केव्हातरी उराउरी भेटते. तिची प्रतीक्षा करीत राहणे एवढेच आपल्या हाती असते.

प्रत्येक कवीला या प्रवासातून जावेच लागते. विजय कुलकर्णी हा कवीही याला



अनुक्रमणिका

अपवाद नाही. त्यांची प्रामाणिक धडपड या संग्रहात दिसून येते. या प्रवासाची सुरुवात त्यांच्या 'रंग जीवनाचे' उजळवून टाको ही शुभेच्छा !

'रंग जीवनाचे'
विजय कुलकर्णी
नेहा प्रकाशन, पुणे
पृष्ठे ६९, मूल्य रु. ६०/-

□

## 'अक्षरभेटी'चा आनंद

श्री. विद्याधर दांडेकर हे गेली अनेक वर्षे सातत्याने कवितालेखन करीत आहेत. त्यांचा 'अक्षरभेट' हा संग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. कविता सुचण्याचा, 'अक्षरभेटी'चा आनंद कवीच्या दृष्टीने इतका मोठा असतो, की कित्येकदा त्या आनंदात त्याचे आत्मभानही हरवून जाते. विद्याधर दांडेकरांनाही हा अक्षरभेटीचा आनंद या संग्रहाने मिळवून दिला आहे.

या संग्रहातील कवितेवर पारंपारिकतेचा मोठा पगडा आहे, तरीदेखील अचानक एखादी ओळ संवेदनांसकट लख्खकन् चमकून जाते.

उदा. 'अनभिज्ञपणे' या कवितेत

*'अनभिज्ञपणे क्षितिजावरती*
*आकाशाचे कमळ उमलते'*

या ओळीत 'अनभिज्ञपणे' या एका शब्दाच्या वापराने सृष्टीचे; व्यापार सहेतुक की निर्हेतुक या तत्त्वज्ञानातील सनातन प्रश्नाला कविता भिडते आणि एक दर्जा गाठते. एरवी मात्र

*'नभ आले झाकळून*
*मोद पाकळी उमले*
*धरतीच्या कुशीतून*
*नवतृण अंकुरले'*

अशी सांकेतिक रचना आढळते.

खरेतर निसर्ग तोच आहे. नभ, धरती, पाने, फुले सारे काही तेच आहे. परंतु कविता नावाच्या भाषिक संरचनेमध्ये या सगळ्या जुन्याचकडे पाहण्याचा स्वतःचा नवा दृष्टिकोन प्रतीत होणे, सत्याच्या अंशाचा तरी अनुभव कवीने स्वतः घेतल्याचा प्रत्यय कवितेतून येणे, ही गोष्ट कवितेला श्रेष्ठत्व वहाल करते. विद्याधर दांडेकर यांचा प्रयत्न त्याच दिशेकडे असावा अशा खुणा संग्रहात सापडतात.

या कवितांवर एक प्रसन्न आनंदीपणाचा तवंग तरंगताना दिसतो. यात काही प्रेमकविता तर काही परमेश्वराला उद्देशून लिहिलेल्या कविता, तर बऱ्याचशा कविता आयुष्य कसे असावे, याविषयी सनातन दृष्टिकोन वाचकांसमोर ठेवतात. ही 'अक्षरभेट' अधिक सुखाची होवो, अशी सदिच्छा !

'अक्षरभेट'
विद्याधर दांडेकर, पुणे
प्रकाशिका : सौ. विनया विद्याधर दांडेकर,
पृष्ठे ५८, मूल्य रु. ३०/-

□

## 'स्नेहमयी'पासून आत्मभानापर्यंत

खूप वेळा असा एक समज आढळतो की एक विशिष्ट प्रकारचे आयुष्य जगले असले म्हणजे आपोआपच आपले जगण्याविषयीचे आकलन वाढते. चार पावसाळे पाहिल्याने जगणे समजते. परंतु तसे नेहमी असतेच असे नाही आणि कवितेची निर्मिती ही तर अजूनही वेगळी घटना असते. खूप सोसले, भोगले, अनुभवले, जाणवले असले तरीसुद्धा ते poetic paraphrase मध्ये येईलच याची

काहीच शाश्वती नसते. प्रतिभा हे निराळेच रसायन असते. तिच्या अभावामुळे संघर्ष, भोगणे, आक्रोश हा नुसताच अकाव्यात्मक पद्धतीने व्यक्त होतो. अनुभवाला काव्यात्मकतेची जोड मिळते. हे केवळ भावनाशीलतेमुळेही शक्य होतेच असे नाही.

स्नेहसुधा कुलकर्णी यांच्या 'स्नेहमयी' नंतरच्या 'आत्मभान' पर्यंतच्या कवितेच्या प्रवासात या सगळ्याचे एकत्रीकरण जाणवते.

या संग्रहातील कवितांच्या केंद्रस्थानी तीनचार आशयसूत्रे सापडतात. त्यात स्त्रीजाणिवांविषयक काही, प्रेमविषयक काही, काही कविता विषयक कविता तर काही चक्क बालकविता आहेत. हे सरळ भाग आहेत. कुठल्याही प्रकारची संदिग्धता, प्रतिमांची गुंतागुंत यात नाहीत. सुस्पष्टता हा या कवितांचा विशेष आहे. स्त्री जाणिवांविषयक कविता असोत किंवा प्रेमविषयक उद्‌गार असो एक गोष्ट जाणवते की, स्नेहसुधाबाईंनी परंपरेची कांस न सोडता हे साधण्याचा प्रयत्न केला आहे. उदा. किती, कसा लावू कळेना हा अर्थ जीवनाचा

किंवा

'अशी आमची फ्लॅट संस्कृती
विसाव्या शतकातली आमची प्रगती'

किंवा

'कळत नाही या जीवनात कसं रमायचं'

किंवा

'ही महानगरी आहे
पोटासाठी जगणाऱ्या
पोटापुरते पाहणाऱ्या
पोटभरू माणसांची'

मात्र या सांकेतिकतेमध्ये अचानक
'मी माझ्या शब्दकोशातून काही शब्द
आता काढून टाकलेत.'

उदाहरणार्थ

विवशता, दौर्बल्य, लाचारी इत्यादी.

यासारखा उद्‌गार वेगळेपणाने उठून दिसतो आणि अनुभवाशी थेटपणे भिडतो.

या संग्रहातील कविताविषयक कविताही अशा विश्लेषणाने लक्ष वेधून घेतात. 'आयुष्य फिरुनि बघते' किंवा 'निर्मिती' या कवितांमध्ये अनुभूतीची 'कळ' जाणवते. आणि सांकेतिकतेला छेद देते —

'बोलू नका ना कोणी
आजचा दिवस किनई
कवितेचा आहे'

यातील लाघव आणि अस्वस्थ हूरहूर, तगमग, कासाविशी कवयित्रीने समर्थपणे व्यक्त केली आहे. कवितारतीतही हाच कविता हीच एक प्राणसखी असल्याचा अनुभव व्यक्त झाला आहे तो आत्मप्रत्ययाचा आनंद देतो —

स्नेहसुधाबाईंची लेखनसंपदा मोठी आहे. अनेक कादंबऱ्या, कथासंग्रह, कवितासंग्रह त्यांच्या नावावरती आहेत. गेली किमान पंचवीस वर्षे त्या लेखन आणि प्रकाशनाच्या कामात निमग्न आहेत. एवढ्या वर्षांमध्ये त्यांनी जमा केलेले संचित मोलाचे आहे एवढे निश्चित.

☐

'स्नेहमयी'
स्नेहसुधा कुलकर्णी, नीहारा प्रकाशन,
पुणे, पृष्ठे ११२, मूल्य रु. ६०/-

☐

अंजली कुलकर्णी
बी/२० झाला हौसिंग कॉम्प्लेक्स,
गुलटेकडी, मार्केट यार्ड, पुणे ३७.



अनुक्रमणिका

# कार्यवृत्त

(१ एप्रिल १९९९ ते ३० जून १९९९)

राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह

**१) ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतीदिन : १०-४-९९**

नेहमीच्या प्रथेनुसार १०.४.९९ रोजी सकाळी ८ वाजता कमला नेहरू उद्यानातील ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांच्या समाधीस पुष्पांजली वाहण्यात आली. यावेळी प्रमुख कार्यवाह राजा फडणीस, कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी, पत्रिकासंपादक ह. ल. निपुणगे, श्री. म. श्री. दीक्षित, श्री. रंगा मराठे, डॉ. शंतनु चिंधडे आदि हजर होते.

संध्याकाळी ६.३० वाजता म.सा.प.च्या सभागृहात डॉ. ग. ना. जोशी यांचे 'साने गुरुजींचे अंतरंग' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**२) सानेगुरुजी जन्मशताब्दी : विशेष कार्यक्रम ११-४-९९**

भावे प्राथमिक शाळेतील ४ थीच्या विद्यार्थ्यांनी श्रीमती रोहिणी सोमण यांच्या मार्गदर्शनाखाली 'मुलांची मायमाउली-सानेगुरुजी' हा आगळा कार्यक्रम म. सा. प.च्या पटवर्धन सभागृहात साजरा केला. अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध बाल साहित्यिक श्री. राजा मंगळवेढेकर होते.

**३) स. ह. मोडक अनुवाद पुरस्कार : १९-४-९९**

दरवर्षी देण्यात येणारा स. ह. मोडक अनुवाद पुरस्कार यंदाचे वर्षी श्रीमती उमा कुलकर्णी यांना, १९-४-९९ रोजी, डॉ. अ. रा. तोरो यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आला.

**४) कै. प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिव्याख्यान : २९-४-९९**

म. सा. परिषद आणि प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या १९ व्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. डॉ. कल्याणी दिवेकर यांचे व्याख्यान २९-४-९९ रोजी पटवर्धन सभागृहात आयोजित करण्यात आले होते. या समारंभाच्या अध्यक्षस्थानी प्रा. डॉ. व. दि. कुलकर्णी होते.

**५) कै. शं. ना. जोशी पारितोषिक समारंभ : ३०-४-९९**

दरवर्षी इतिहास/सामाजिक विषयातील सर्वोत्तम पुस्तकास देण्यात येणारे रु. ५०००/- कै. शं. ना. जोशी पारितोषिक यंदाचे वर्षी श्री. वि. स. वाळिंबे यांना, त्यांच्या 'स्वातंत्र्यसंग्राम : ज्ञात आणि अज्ञात' या ग्रंथास श्री. मोहन धारिया यांच्या हस्ते, दिनांक ३०-४-९९ रोजी समारंभपूर्वक देण्यात आले. परीक्षक म्हणून प्रा. सदाशिव आठवले व प्रा. स. ह. देशपांडे यांनी काम पाहिले.

**६) प्रा. म. ना. अदवंत व प्रा. रमेश तेंडुलकर श्रद्धांजली सभा - २१ मे १९९९**

परिषदेचे हितचिंतक, कार्यकर्ते व समीक्षक प्रा. म. ना. अदवंत व सुप्रसिद्ध काव्य समीक्षक

प्रा. रमेश तेंडुलकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी २१ मे, १९९९ रोजी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांचे अध्यक्षतेखाली शोकसभेचे आयोजन करण्यात आले होते.

यावेळी प्रा. चंद्रकांत अडावरकर (नाशिक) डॉ. सौ. शकुंतला आठवले (चाळीसगाव) डॉ. चंद्रशेखर बर्वे, डॉ. द. दि. पुंडे व डॉ. आनंद यादव आदि वक्त्यांची भाषणे झाली. सभेच्या शेवटी श्रद्धांजली वाहणाऱ्या ठरावाचे वाचन करण्यात आले.

**७) वार्षिक ग्रंथ पारितोषिक वितरण समारंभ : २६ मे १९९९**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वर्धापन दिनानिमित्त, विविध साहित्य प्रकारातील विविध पुस्तकास दरवर्षी देण्यात येणारी व विविध वाङ्मय प्रकारात महत्त्वाची भर घातलेल्या ज्येष्ठ लेखकांचा सन्मान पारितोषिके देण्याचा स्वतंत्र समारंभ, २६ मेला साजरा करण्याची प्रथा गेल्या ५/६ वर्षांत सुरू करण्यात आली आहे. त्यानुसार यंदाचे वर्षीही हा समारंभ २६ मेला म. सा. प. च्या सभागृहात, पुणे विद्यापीठाचे, कुलगुरु डॉ. अरुण निगवेकर यांच्या हस्ते साजरा करण्यात आला. यावेळी २० पुस्तकांच्या लेखकांना व सात विविध विषयात लेखन करणाऱ्या लेखकांना पारितोषिके देण्यात आली. तसेच ही विविध पारितोषिके देण्यासाठी ज्या देणगीदारांनी म. सा. प. ला देणग्या दिल्या आहेत, त्या उपस्थित देणगीदारांचे व सर्व उपस्थित परीक्षकांचा पुष्पगुच्छ देऊन डॉ. निगवेकरच्या हस्ते सत्कार करण्यात आला. यावेळी परीक्षकांच्या वतीने डॉ. कृ. ज्ञा. भिंगारकर आणि सौ. मृणालिनी शहा यांची भाषणे झाली. परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी स्वागतपर भाषण केले. कार्यवाह डॉ. वि. भा. देशपांडे यांनी श्री. निगवेकर यांची ओळख करून दिली. प्रमुख कार्यवाह राजा फडणीस यांच्या हस्ते डॉ. निगवेकर यांचा शाल व श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. या समारंभाची सुरुवात, डॉ. शिल्पा पुणतांबेकर यांनी शारदास्तवन म्हणून केली. पारितोषिकासंबंधी माहिती कार्यवाह श्रीमती नंदा सुर्वे यांनी दिली. पारितोषिक वितरणानंतर पारितोषिक विजेते सर्वश्री मीरा धांडगे, डॉ. श्रीरंग संगोराम, रंगनाथ लोकापूर, डॉ. वि. म. कुलकर्णी आदिंनी आपले विचार मांडले. शेवटी डॉ. निगवेकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. पत्रिकासंपादक श्री. ह. ल. निपुणगे यांनी सर्वांचे आभार मानले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यकारी मंडळाचे सदस्य श्री. अरविंद भुजवळ यांनी केले.

**८) २७ मे १९९९ : परिषदेचा ९३ चा वर्धापन दिन**

परिषदेचा ९३.वा वर्धापन दिन पत्रकार भवनात दि. २७ मे १९९९ रोजी, अ. भा. मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षा श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या उपस्थितीत, परिषदेचे अध्यक्ष सुप्रसिद्ध कथाकार श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. श्रीमती मधुरा दातार यांच्या शारदास्तवनाने समारंभाची सुरुवात झाली. उपस्थितांचे स्वागत व प्रास्तविक भाषण, कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी केली.

दरवर्षी ज्येष्ठ साहित्यिकास देण्यात येणारा महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार यंदाचे वर्षी सुप्रसिद्ध कथा/कादंबरीकार श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांना देण्यात आला. मानचिन्ह व रोख रु. ५०००/- चा हा पुरस्कार आहे.

प्रथमत: या पारितोषिकासंबंधी माहिती सांगून श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांचा कल्याणी दिवेकर यांनी परिचय करून दिला. त्यानंतर हे पारितोषिक प्रमुख पाहुण्या श्रीमती वसुंधरा पेंडसे - नाईक यांच्या हस्ते श्रीमती देवधर यांना देण्यात आले. यावेळी केलेल्या भाषणात श्रीमती देवधर यांनी आपल्या साहित्यिक जीवनाचा आलेख अत्यंत सुंदर भाषेत मांडला. त्यांच्या या मनोगतानंतर, दरवर्षी देण्यात येणाऱ्या डॉ. भीमराव कुलकर्णी पारितोषिकाची व हे पारितोषिक मिळविणारे यंदाचे मानकरी-विदर्भ साहित्य संघाचे सरचिटणीस श्री. मनोहर म्हैसाळकर यांचा परिचय कोषाध्यक्ष रत्नाकर कुलकर्णी यांनी करून दिला. त्यानंतर हा रोख रु. १०००/-, शाल व श्रीफळ चा पुरस्कार परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र वनहट्टी यांच्या हस्ते श्री. मनोहर म्हैसाळकर यांना प्रदान करण्यात आला. श्री. मनोहर म्हैसाळकर यांनी आपले मनोगत व्यक्त केले. परिषदेचे माजी विश्वस्त श्री. म. श्री. दीक्षित यांच्या वयाला ७५ वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने त्यांचा, शाल व श्रीफळ देऊन परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. तत्पूर्वी श्री. म. श्री. दीक्षित यांचा परिचय कार्यवाह श्री. ओमप्रकाश होळीकर यांनी करून दिला. श्री. म. श्री. दीक्षित यांनी आपल्या मनोगतात परिषदेचे आभार मानले.

नंतर म. सा. पत्रिका क्र. २८९ चे प्रकाशन परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंन्द्र वनहट्टी यांनी केले. या अंकाची माहिती डॉ. शंतनु चिंधडे यांनी दिली.

यानंतर प्रमुख पाहुण्या श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांनी आपले विचार मांडले. त्यांनी श्रीमती ज्योत्स्ना देवधर व श्री. मनोहर म्हैसाळकर यांच्यावद्दल गौरवोद्गार काढले. तत्पूर्वी परिषदेमार्फत त्यांचा सत्कार करण्यात आला.

शेवटी परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र वनहट्टी यांनी अध्यक्षीय समारोप केला.त्यांनी गेल्या वर्षांत कार्यकारी मंडळाने जे काम केले त्यावद्दल समाधान व्यक्त केले. त्याशिवाय महाराष्ट्रातील सर्व विचार-प्रवाहाचे एकत्रीकरण करण्याचे दृष्टीने अ. भा. मराठी साहित्य मंडळाने पुढाकार घ्यावा असे सुचविले.

समारंभाचे शेवटी कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले व श्रीमती माधवी वैद्य यांनी पदायदान म्हटले. या समारंभाचे सूत्रसंचालन डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले.

**९) आचार्य अत्रे स्मृतिदिन - १३ जून १९९९**

आचार्य अत्रे यांच्या स्मृतिदिनानिमित्त श्री. मधुकर टिल्लू यांचे 'जगण्यासाठी हसा व हसण्यासाठी जगा' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**१०) कै. नाथमाधव स्मृतिदिन : २१-६-९९**

कै. नाथमाधव स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध कादंवरीकार श्री. बाबा कदम यांचे 'लोकप्रिय लेखकाची सुख दु:खे' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

**११) २२ जून ९९ : एक विशेष कार्यक्रम**

संतश्रेष्ठ श्री. एकनाथ महाराज यांचे ४०० वे निर्वाणवर्ष व संतश्रेष्ठ श्री. तुकाराम महाराज यांचे ३५० वे निर्वाण वर्षाच्या निमित्ताने 'एका जनार्दनी - तुका म्हणे' हा श्रद्धा भक्ती मंडळाचा अभंग - गायनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. रवींद्र काशीकर,

अरविंद भाटे, प्रतिभा देशपांडे, अनुराधा अवसरीकर, जयश्री कुलकर्णी आदिंनी सुरेख अभंग सादर केले. या कार्यक्रमाचे संयोजन श्रीराम साठे यांनी व सूत्रसंचालन मीरा ठकार यांनी केले.

**१२) २३ जून १९९९ - कै. का. र. मित्र स्मृतिदिन**

कै. का. र. मित्र स्मृतिदिनानिमित्त सुप्रसिद्ध पत्रकार - लेखक श्री. ह. मो. मराठे यांचे 'माझ्या संपादयकीय वाटचालीतील बरे वाईट अनुभव' या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झाले.

**१३) कै. दि. बा. मोकाशी पारितोषिक**

कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मृत्यर्थ प्रतिवर्षी महाराष्ट्र साहित्य परिषदेमार्फत आलटून / पालटून कथा, कादंबरी, प्रवासवर्णन यापैकी एका वाङ्मय प्रकारातील प्रथम प्रकाशित पुस्तकाच्या लेखकाला रु. १०००/- चा पुरस्कार देण्यात येतो. यंदाचे वर्षी हा पुरस्कार श्री. संजय जोशी यांच्या 'नचिकेताचे उपाख्यान' या कादंबरीस देण्यात आला. निवड समितीचे सदस्य म्हणून श्रीमती आशा कर्दळे व सुजाता शेणई यांनी काम पाहिले. हा पुरस्कार २३ जून १९९९ रोजी देण्यात आला.

**परिषदेस मिळालेल्या देणग्या**

१) डॉ. कै. वा. दा. गोखले यांच्या स्मृत्यर्थ सौ. संजीवनी गोखले यांनी रु. १०००/- ची विनाअट देणगी परिषदेस दिली.

२) कै. कमलाकर सारंग यांच्या स्मृत्यर्थ त्यांच्या स्मृतिदिनी दरवर्षी रु. १५००/- चा उत्कृष्ट नाट्यसंहितेला पुरस्कार देण्यासाठी रु. २००००/- देणगी सुप्रसिद्ध अभिनेत्री श्रीमती लालन सारंग यांना दिली. हा पुरस्कार यंदाचे वर्षीपासूनच देण्यात येणार आहे.

परिषद या देणगीदारांची आभारी आहे.

**कार्यकारी मंडळ सभा -**

या तिमाहित २७ मे ९९ रोजी कार्यकारी मंडळाची प्रथम सभा घेण्यात आली.

या कालावधीत श्री. प्रमोद आडकर यांनी राजीनामा दिल्यामुळे रिकाम्या झालेल्या जागी स्थानिक कार्यवाह म्हणून श्रीमती नंदा सुर्वे यांची निवड करण्यात आली.

**शाखावृत्तांत**

**वाईशाखा : एप्रिल, मे, जून ९९ मध्ये झालेले कार्यक्रम**

१) दि. २ एप्रिल १९९९ रोजी, प्रा. डॉ. सौ. नीलम हातेकर आणि प्रा. रत्नाकर हातेकर यांची 'सानेगुरुजींचे साहित्य' या विषयावर भाषणे झाली. सभेच्या अध्यक्षस्थानी श्री. अशोक भट होते. श्री. मधु नेने यांनी सभेचे सूत्रसंचालन करून आभारप्रदर्शन केले.

२) दि. २७ एप्रिल १९९९ रोजी वाई येथील किसनवीर महाविद्यालयातील मराठी विभाग प्रमुख डॉ. पंडित टापरे यांचे, 'श्यामची आई' या सानेगुरुजींच्या प्रसिद्ध कादंबरीवर रसग्रहणात्मक भाषण झाले. अध्यक्षस्थानी ॲड. अशोक भट होते. श्री. मधु नेने व श्री. चंद्रकांत मापारी यांनी, अनुक्रमे परिचयाचे व आभार मानण्याचे काम केले.

३) मागल्या पिढीतील ज्येष्ठ कथाकार कै. दिवाकरकृष्ण (केळकर) यांच्या २६ व्या पुण्यतिथीनिमित्त ज्येष्ठ समीक्षक प्रा. डॉ. पंडितराव टापरे यांच्या अध्यक्षतेखाली

डॉ. सौ. वासंती दत्तात्रय देवधर यांचे 'दिवाकरकृष्ण : व्यक्ति आणि वाङ्मय' या विषयावर दि. ३१ मे १९९९ रोजी व्याख्यान झाले. यावेळी सौ. देवधर यांचा, वाचस्पती पदवी प्राप्त केल्यावद्दल वाई शाखेचे अध्यक्ष ॲड. श्यामराव जोशी यांचे हस्ते सत्कार करण्यात आला. ॲड. अशोक भट यांनी, अध्यक्षीय समारोप केला. श्री. मधु नेने यांनी सौ. देवधर यांचा परिचय करून दिला. ॲड. उमेश सणस यांनी आभार मानले.

४) कै. सानेगुरुजी यांच्या ४९ व्या स्मृतिदिनानिमित्त, दि. ११ व १२ जून १९९९ रोजी अनुक्रमे, डॉ. सौ. वासंदी देवधर व श्री. मधु नेने, यांची, 'साने गुरुजींचे सर्वस्पर्शी व्यक्तिमत्त्व' आणि 'साने गुरुजी आणि भारतीय संस्कृती' या विषयांवर व्याख्याने आयोजित करण्यात आली होती.

**धुळे शाखा**

दि. १ एप्रिल ९९ रोजी कै. विद्याधर वैद्य यांच्या स्मृतिदिनानिमित्त कवि संमेलनाचा कार्यक्रम शाहीर अमरशेख पुरस्कारप्राप्त ज्येष्ठ शाहीर श्री. करीम शेख यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झाला. याप्रसंगी कविश्रेष्ठ कै. तात्यासाहेव (वि. वा. शिरवाडकर) तथा कुसुमाग्रज यांना जाहीर श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

कविसंमेलनात कविवर्य पुरुषोत्तम पाटील यांनी कै. कुसुमाग्रजांच्या व प्रा. दिलीप चव्हाण यांनी विद्याधर वैद्यांच्या कविता सादर केल्या. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी अहिराणीचे सुप्रसिद्ध कवि प्राचार्य सदाशिवराव माळी होते. कविसंमेलनात प्रा. रविकिरण झोळ, प्रा. अनिल सोनार, प्रा. सुलभा भानगावकर, प्रा. भगवान ठाकूर, श्री. जगदीश देवपूरकर, सौ. सुषमा गरुड, दीपक निकम, प्रभा निकुंभे, सतीशचंद्र कुलकर्णी, सुभाष अहिरे, प्रभाकर शेळके, राजेंद्र जगताप, हेमराज वागुल, पी. यु. पवार व जवळपास ३५ नवोदित कवींनी कविता सादर केल्या. प्राचार्य सुलभा भानगावकर, डॉ. श्रीपाल सवनीस, प्रा. सौ. शशिकला पवार, श्री. उत्तम कोळगावकर, प्राचार्य व्ही. डी. देवरे यांचा सत्कार आयोजित करण्यात आला होता. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. प्रभाकर शेळके व आभार प्रदर्शन श्री. सुभाष अहिरे यांनी केले.

दि. २३ एप्रिल ९९ रोजी जागतिक ग्रंथ दिनानिमित्त 'ग्रंथानी मला काय दिले?' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला. परिसंवादात प्राचार्य डॉ. मु. रा. तांवे, प्राचार्य पुरुषोत्तम पाटील, प्राचार्य डॉ. के. बी. पाटील व प्रा. प्रकाश पाठक यांनी त्यांच्या वाचनात आलेल्या सर्वोत्तम ग्रंथाचा आस्वादक समीक्षेच्या अंगाने परामर्श घेतला. मानवी जीवन ग्रंथवाचनाने उन्नत आणि समृद्ध होते असा एकूण परिसंवादाचा निष्कर्ष मान्यवर वक्त्यांनी काढला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रा. ओमप्रकाश होळीकर. स्वागत प्राचार्य सी. आय. मोरे, परिचय प्रा. सौ. शशिकला पवार, सूत्रसंचालन प्रा. सौ. राजश्री शेलकर आणि आभार श्री. मोहन मोरे यांनी मानले. ☐

**स्वागत**

- ❑ **मुद्रा :** सुधीर गाडगीळ, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९४
- ❑ **सचिन तेंडूलकर :** बाळ ज. पंडित, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे २५६

## स्वागत

- **खोती विरुद्धचा लढा :** दलितमित्र चंद्रकांत अधिकारी (वकील), प्रकाशक स्वत: लेखक, पृष्ठे १२५
- **माझी चिंध्यांची बाहुली :** अनुराधा वैद्य, सुकन्या प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १११
- **बाकी क्षेम :** अनुराधा वैद्य, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १७४
- **चित्रफल :** अनुराधा वैद्य, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६८
- **जोगवा :** अनुराधा वैद्य, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १६७
- **अजुनी खुला हा :** अनुराधा वैद्य, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे १०२
- **राणी वसा :** अनुराधा वैद्य, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे ११२
- **रेतीवरल्या रेघा :** मनीषा दीक्षित, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, पृष्ठे ८३
- **माणसे ही अशीच :** डॉ. पा. श्री. घारे, श्री विद्या प्रकाशन, पृष्ठे ११५

---

## श्रद्धांजली

बालकुमार वाङ्मयाचे प्रसिद्ध लेखक शं. रा. देवळे यांचे १३ जानेवारी, ९९ रोजी निधन झाले.

बालसाहित्यकार पंढरीनाथ रेगे यांचे २५ एप्रिल, ९९ रोजी दु:खद निधन झाले.

'रुचिरा' या प्रसिद्ध पाकशास्त्रावरील पुस्तकांच्या लेखिका कमलाबाई ओगले यांचे २१ एप्रिल, ९९ रोजी निधन झाले.

नामांकित ग्रंथपाल कृ. शं. हिंगवे यांचे ६ मे, ९९ ला निधन झाले.

प्रसिद्ध हार्मोनियमवादक बाळ माटे यांचे १६ मे, ९९ रोजी निधन झाले.

कवी आणि काव्यसमीक्षक प्रा. रमेश तेंडुलकर यांचे १८ मे, ९९ रोजी निधन झाले.

कवी कृ. ब. निकुंब यांचे १७ जून, ९९ रोजी निधन झाले. महाराष्ट्र साहित्य परिषदेशी त्यांचा अत्यंत जवळचा संबंध होता.

ज्येष्ठ साहित्यिक श्रीपाद काळे यांचे १७ जून, ९९ रोजी निधन झाले.

प्रसिद्ध विनोदी नट वसंत शिंदे यांचे ४ जुलै, ९९ रोजी निधन झाले.

सामाजिक कार्यकर्त्या आणि लेखिका इंदूताई टिळक यांचे १५ जुलै, ९९ रोजी निधन झाले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या पत्नी सुनीता जोगळेकर यांचे ४ जून, ९९ ला निधन झाले.

वरील सर्वांच्या कुटुंबियांच्या दु:खात आम्ही सहभागी आहोत.

परमेश्वर मृतात्म्यांना चिरशांती देवो, हीच प्रार्थना.

— संपादक

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

## नवे आजीव सभासद

विद्र मेधा सदानंद, देहुरोड
जोशी सुहासिनी चंद्रशेखर, वडगाव
पगारे म. सु., धुळे
कदम सदानंद रघुनाथ, सांगली
कुवारे चिंतामणी विनायक, पुणे
ठोंबरे विठ्ठल वापुजी, पुणे
कुलकर्णी अभिजित भुजंगराव, पुणे
महाजन लता प्रकाश, शारदानगर
कुलकर्णी प्रल्हाद अच्युत, सांगली
सातव राजश्री सीताराम, वाघोली
सोनपाटकी प्रभाकर लक्ष्मण, वाई
रांजणे लक्ष्मीकांत श्रीपाद, वाई
कुलकर्णी गोविंद नरहर, वाई
गरुड विनायक मोहनराव, पुणे
दिवेकर अंजली चंद्रकांत, मिरज
अभ्यंकर निकीत अजीत, पुणे
भगत पुजा राजीव, पुणे
नाईक उषा रमण, पुणे
आपटे वंदना, पुणे
जोगळेकर प्रकाश वसंत, पुणे
चांदोरकर आशिष अरविंद, पुणे
पोकळे पार्थ, सातारा
डिके मयुरेश नारायण, पुणे
कुलकर्णी अनुपमा अविनाश, पुणे
मोहिते शिवाजीराव निवृत्ती, सांगवी
जोगळेकर वर्षा संजय, पुणे
सवाई विनायक दामोदर, पंढरपूर
निकते प्रकाश दत्तात्रय, पंढरपूर
स्वामी पुष्पलता विरुपाक्ष, पंढरपूर
जोशी अरविंद रामचंद्र, पंढरपूर
धांडोरे गणेश चोखा, पंढरपूर
पुरंदरे सतीश प्रभाकर, पंढरपूर
वाडेकर अरुण शंकर, पंढरपूर
भिडे गुरुनाथ गोविंद, पंढरपूर
कोर्टीकर अशोक वामन, पंढरपूर
कुलकर्णी शांताराम पांडुरंग, पंढरपूर
कुलकर्णी नंदकुमार नारायण, पंढरपूर
कुंटे प्रभाकर कृष्णाजी, पुणे
साठ्ये दिनकर रामचंद्र, धायरी, पुणे
विराजदार बदीऊज्जमा गुलामदस्तगीर, सोलापूर
कापरे प्रदीप श्रीराम, पुणे
पदे मधुसुदन विनायक, पुणे
सव्वन अशोक रमेश, अहमदनगर
पेठे विजया विजयकुमार, पुणे
कवळे रोहिदास प्रभाकर, मोहपाडा
मानकर वैशाली, पुणे
पतकी अनिल वसंत, पुणे
जोशी रामचंद्र केशव, पुणे
तापकीर संदीप भानुदास, चऱ्होली
पवार संतोष भीमराव, दुधारी
पाटील ॲड वाळासाहेव सदाशिव, उरण, इस्लामपूर
मुळीक जगन्नाथ दत्तात्रय, इस्लामपूर
चांदवणकर अविनाश शांताराम, पुणे
गोखले श्रीपाद दत्तात्रेय, पुणे
पाटील प्रा. रवींद्र, धुळे
आवटे जगदीश सदाशिव, वाघोली
नाईक शोभा अनंत, वेळगाव
जोशी जयंत रामकृष्ण, पुणे
निकाळजे उपेंद्र दगडू, अहमदनगर
कांकरिया सुधा प्रकाश, अहमदनगर
महाजन दिपाली अरुण, अंवेजोगाई
कोळी ज्ञानेश्वर गोविंद, अंकलखोप

□








अनुक्रमणिका









# मराठी वाङ्मयाचा इतिहास

खंड ३ रा, ४ था, आणि
५ वा (भा. १ व २)

संपादक
प्रा. रा. श्री. जोग



अनुक्रमणिका



Maharashtra Sahitya Patrika Quarterly JULY - AUGUST - SEPTEMBER 1999.
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57